# केल्याने शीर्षासन

लेखक :डॉ. नितीन मोरे

Mobile No. 98209 37490, 98696 73415.

Email - drnmore@yahoo.com



प्रकाशक ई साहित्य प्रतिष्ठान :

www. esahity. com

esahity@gmail. com

प्रकाशन : २१ ऑगस्ट २०१६

## प्रस्तावना

# उपरोध मीच केला. . . .

शब्द.

शब्दांची ताकद अफाट आहे. दर पाच वर्षांतून येणाऱ्या निवडणूकांत आपण गेल्या सहाहून अधिक दशकांत हे पाहिलेच आहे. पक्ष कोणीही असो, नेता कोणीही असो, आपल्या भाषणांच्या जोरावर लोकांच्या कल्पनाशक्तीला चालना देतो आणि आपली मते मोजून घेतो.

शब्द शस्त्र आहे, अस्त्र आहे. उपरोध हा शाब्दिक शस्त्राचा अविष्कार आहे. प्रस्तुत संग्रहातील लेख काल आजच्या राजकीय अवकाशाकडे नि सामाजिक वास्तवाकडे उपरोधिकतेने दृष्टिक्षेप टाकण्याचा प्रयत्न आहे.

या सगळयांतून काही सुधारेल असा भाबडा आशावाद बाळगण्याचे कारण नाहीच, पण मनातील कागदावर उतरवण्याचे एक समाधान!

त्यातून 'उपरोध मीच केला' तरी लोकशाही कृपेने तो अपराध मानून काही 'शिक्षा कपाळी' मिळत नाही याचेच समाधान!

माझ्या पहिल्या 'चक्रमादित्यांचा दरबार' मध्ये हाच प्रयत्न थोड्या वेगळया form मध्ये केला होता. एकूण या उपरोधाचा प्रयत्न वाचकांना रूचावा अशी अपेक्षा आहे.

डॉ. नितीन मोरे

अनुक्रमणिका

या संग्रहातील सर्व लेख हे काल्पनिक असून त्यांतील व्यक्ती, स्थळे, प्रसंग यांचे कोणाला स्वतःशी साम्य दिसून आल्यास त्यांनी ते कोणाला सांगू नये.

उगाच स्वतःचे हसे करून घ्याल.

हे हे हे !!!

१

**केल्याने शीर्षासन**

*लोकमान्यांनी 'सरकारचे डोके ठिकाणावर आहे काय?' असा अग्रलेख लिहिला, त्यासाठी ते तुरूंगातही गेले. स्वातंत्र्यानंतर कित्येक सरकारे देशात नि राज्यात आली, पण त्यांना टिळकांबद्दल एवढा आदर की त्यांचा शब्द खोटा पडू नये अशीच कामे सरकारामागून सरकारे करत आहेत. कित्येक संपादक टिळकांनी पुरवलेले रेडिमेड शीर्षक वापरून अग्रलेखाचे कॉलम्स भरत आहेत. आता मात्र या डोक्याच्या ठिकाणावर नसण्याची एवढी सवय जनता जनार्दनास पडली आहे की एखाद्याचे डोके ठिकाणावर असणेही 'आऊट ऑफ फॅशन' समजले जाऊ लागले आहे.*

*§*

आमचे परम पूजनीय आणि सदा प्रात: स्मरणीय श्री गणूमहाराज म्हणतात, 'प्राण्या, नेहमी शीर्षासन कर. '

*§*

'फ' हा एक सामान्यातिसामान्य इसम म्हणावा इस किस्मका आपला एक नागरिक आहे. अशा ठिकाणी एखाद्यास 'क्ष' मानायची पद्धत असते पण आपण इथे त्याला 'फ' मानून माफक साहित्यिक बंडखोरी करायला हरकत नाही. तर गोष्ट त्या फ ची आहे. फ आपला रहाट गाडग्यास जुंपलेला आम आदमी आहे.

तो दररोज सकाळी उठला की घडाळ्याचा अलार्म बंद करतो. मग आपल्या डोक्यावरील चावी फुल्ल फिरवतो. ती त्याला पूर्ण दिवस पुरते. त्याचे डोके एकदम ठिकाणावर राहते. रात्रीपर्यंत चावी त्याला पुरते. ती संपली की मग तो झोपी जातो. दुसऱ्या

दिवशी परत हाच क्रम. आपल्याकडे डोके फिरवून वागायला आपण कोणीतरी मोठी व्यक्ती किंवा सत्तेतील कौणीतरी असावे लागते. फ काही तसा नाही. त्याला त्यामुळे डोके फिरवून वागायची परवानगी नाही.

दररोज सकाळी फ ची बायको फ ला 'हे का नाही केले' किंवा 'ते का नाही केले' म्हणून चिडते. तो शांतपणे सर्व ऐकून घेतो. न्याहारी झाली की डबा बॅगेत ठेवून फ ऑफिसला निघतो. रस्त्यात हीऽ गर्दी. धक्के खात फ स्टेशनवर पोहोचतो. ट्रेन कधी कधी वेळेवर देखील येते. त्या दिवशी त्याला अति आनंदाचे भरते येते. कसाबसा ट्रेनमध्ये तो लटकतो. गर्दीत कोणाला तरी धक्का लागायचा किंवा पायावर पाय पडायचाच. मग थोडी बाचाबाची. एरव्ही वेळेवर आलेली नि शहाण्यासारखी आलेली ट्रेन व्हीटी स्टेशन पासून दोन मिनिटांवर लग्नात मनगटी घड्याळ हवे म्हणून रुसून बसलेल्या नवऱ्यामुलासारखी हटून बसते. ऑफिसला लेट मार्क लागायचा काही चुकत नाही. लाल मार्क लागला की साहेबाचे आमंत्रण यायचे. ते रितसर ओरडून, चिडून झाले की दिवस खरा सुरू होतो. ऑफिसात कामाचा ढीग पडलेला. फायलींच्या ट्रेचा तराजू इन मध्ये भरलेला नि आऊट मध्ये एकदम खाली. मग मान मोडून इन मधून आऊट मध्ये फायली हलवणे सुरू. मध्ये मध्ये साहेब आपल्या केबिनीत आपला ओरडा खाऊ घालतात, तो पचवित काम निपटायचे. साहेबांचे ओरडणे अंगवळणी पडल्याने एखाद दिवस तसे झाले नाही तर दुपारचे जेवण गोड लागत नाही फ ला. साडेपाचची निघायची वेळ झाली की साहेबांना काहीतरी नेमके काम आठवते. एकदा पाच सदोतीस चुकली की पुढच्या गाड्यांत बदलापुर पर्यंत पूर्ण उभ्याने प्रवास करावा लागतो. उशीर होतो तो वेगळाच. घरी पोहोचेपर्यंत बायकोने काहीतरी आणायला सांगितले होते याचा विसर पडतो. या विसरभोळेपणापायी रीतसर बोलणी चहा बरोबर खाऊन झाली की परत फ ते सामान आणावयास तंगड्या तोडत बाहेर पडतो. घरी येतो तर तर मुलांबद्दल शाळेतून आलेल्या तक्रारी त्याचे स्वागत करतात. शहाणी मुलं नेहमी इतरांच्याच घरी का जन्मतात हे फ ला कळत नाही. रात्रीचे जेवण झाले की त्याने सकाळी दिलेली चावी संपते नि तो निद्राधीन होतो. दुसऱ्या दिवशी परत हेच.

हेच आपले प्राक्तन की काय म्हणतात ते असावे असे फ ला वाटते. आधी फ त्याला नशीब असा साधा शब्द वापरायचा पण संस्कार की कोणता चॅनल पाहून फ प्राक्तन शब्द वापरायचा. भारदस्त शब्द वापरले की कसे बरे वाटते.

§

आज काही वेगळेच घडले. फ ने चावी दिली स्वत:ला पण ती उलटी फिरली असावी बहुधा. फ उठला तर हातावर उभा राहिला. त्याचे डोके खाली नि पाय वर. फ ला सगळे  उलटे दिसायला लागले. आपल्या हातावर आपण इतके पटापट चालू शकतो याचे फ ला आश्चर्य वाटले.

फ उलटा उभा राहिलेला पाहून फ ची बायको चक्रावली. ती नेहमी प्रमाणे रागावूनच बोलली. पण खाली डोके वर पाय केलेल्या फ ला ते सर्व उलट प्रेमाने बोलल्या सारखे ऐकू आले नि फ खूश झाला. फच्या पायांकडे पाहून बायको म्हणाली, 'डोकं ठिकाणावर नाही काय हो तुमचे?'

नेहमीप्रमाणे फ निघाला. सर्व फ कडे आश्चर्याने पाहात होते. उलट्या नजरेने बघणाऱ्या फ ला त्याचे कौतुक वाटले. ट्रेनला नेहमीप्रमाणे गर्दी, पण फ ला त्याची गंमत वाटली.  ट्रेन आली. गुळाच्या ढेपेला मुंगळे चिकटावे तसे लोक ट्रेनला चिकटले असतात. फ त्यातील एक मुंगळा बनून चिकटला. व्हीटी आधी ट्रेन थांबली. नेहमीप्रमाणे त्या थांबलेल्या ट्रेनमधून काही मुंगळयांनी उड्या टाकल्या. त्यामुळे ट्रेन रिकामी झाली नि मोकळा श्वास घेता आला म्हणून फ ला बरे वाटले. ऑफिसला नेहमीप्रमाणे उशीर होणारच असतो पण त्यात नवीन ते काय? मस्टर वरील हिरव्या कागदावर लेट मार्कांच्या लाल खुणांची नक्षी फ ला आवडली. साह्ेबांचे बोलावणे येते. त्याचे पाय टेबलावर पाहून ते चक्रावले. त्यांचे ओरडणे फ ला मंजूळ गाण्यासारखे वाटले. साहेबांची नजर अति प्रेमळ असल्यासारखे फच्या उलट्या नजरेस जाणवले.

साहेब म्हणाले, 'श्री. फ डोके कुठेय तुमचे?'

फ टेबला जवळ आला तर फ चे टेबल नि खुर्ची दोन्ही उलटे झाले. फ हवेत लटकत बसला. लोकांच्या कौतुक आणि प्रेमाच्या नजरा फ वर खिळल्या. आज कामाचे ओझे वाटत नाही. उलट मजा येते. साहेबांनी मध्ये मध्ये बोलावले पण फ चे कौतुक करून फ ला परत पाठवले. निघताना नेहमी प्रमाणे फ ची ट्रेन साहेबांनी चुकवलीच पण आज फ ला त्याची फिकीर नाही. फ उशीरा घरी पोहोचला. आणायचे सामान विसरला. बायको प्रेमाने 'दमला असाल' असे म्हटल्यासारखे फ ला ऐकू आले. विसरलेले सामान आणायला फ परत आनंदाने निघाला. घरी परत आला तर मुले आदर्श विद्यार्थ्यासारखी अभ्यास करत बसलेली. रात्रीचे जेवणही फ ला स्वादिष्ट वाटले. आजची चावी संपू नयेसे वाटते पण ती चावी संपतेच नि फ झोपी जातो.

दुसऱ्या दिवशी मोठ्या अपेक्षेने चावी उलटी फिरवू पाहातो पण चावी काही तशी फिरतच नाही. नेहमी प्रमाणेच आपला पायावर फ चालू लागतो.

खाली डोके वर पायाची गंमत फ ला आवडली असते. भारदस्त भाषेत त्याला शीर्षासन म्हणतात म्हणॆ. मोठे शब्द वापरले की कसे बरे वाटते.

§

एखादी गोष्ट आपण बघू तशी दिसते. शीर्षासनाने सगळया गोष्टी उलट्या दिसायला लागतात. चांगल्या गोष्टी वाईट नि वाईट चांगल्या. शीर्षासनाने सगळीकडे चांगुलपणाचा कसा पूर आल्यासारखा दिसायला लागतो. थोडक्यात काय तर,

केल्याने शीर्षासन

मनुजा दिसतसे सर्वच छान.

म्हणूनच आमचे परम आदरणीय श्री. गणू महाराज म्हणतात, 'प्राण्या नेहमी शीर्षासन कर. '

२

## कायदेपालक मोरूचा तोडगा

मध्ये फेसबुकावर काहीतरी लिहिल्याबद्दल अद्दल म्हणून कुणातरी मुलीला अटक झाली आणि मोरूचा ऊर भरून आला. पश्चिम बंगालात कुणातरी उपद्रवी प्राध्यापकाला मागे अटक झाली होती. नंतर आपल्याकडे कुणी कार्टूनिस्ट पकडला गेला पण हे कुठल्यातरी राजकीय चळवळीतले होते. या फेसबुकातली मुलगी अगदीच फेसलेस म्हणजे सामान्य होती. तरीसुद्धा तिच्या एकुलत्या मताची दखल घेणारे सरकार आणि पोलिस आपल्याला लाभले. आपले भाग्यच थोर. मोरूला अभिमान वाटला. लोकशाही लोकशाही म्हणतात ती हीच. ह्या खास लोकांनी खास लोकांसाठी चालविलेल्या खास लोकशाहीत आपण जन्मलो म्हणून त्याला धन्य धन्य वाटले. परत हे सर्व आपल्या मायमराठी भूमीत घडावे याचे त्याला विलक्षण समाधान वाटले. ज्या तत्परतेने या समाजद्रोहींचा बंदोबस्त झाला हे पाहून या मंगल, पवित्र आणि दगडांच्या देशाचे त्याला कौतुक वाटले.

मागे आंबेडकरांवरील शंकर की गणपती या कार्टूनिस्टने फार वर्षांपूर्वी काढलेल्या कार्टून मुळे संसद पण अस्वस्थ झाली होती. त्यावेळी ही हीच तडफ सर्वांनी दाखवलेली होती. कोण कुठले ते जुने पुराणे कार्टून पण आजच्या मुलांच्या कोवळया मेंदूनी कलुषित आणि प्रदूषित होऊ नये म्हणून सर्व जण पेटून उठले. सर्व मंत्री आणि संत्री कसे तेजाने तळपत होते ते सर्व देशाने पाहिले. तेव्हाही मोरू असाच खूश झाला होता. त्यावेळी काही मुलांनी तरी ही कार्टून्स पाहिली असावीत, काहींनी वाचली असावीत तर काहींना कळलीही असावीत अशा मुलांच्या भवितव्याविषयी सर्वांचा कंठ दाटून आला. मग या सर्व मुलांची त्या कार्टून वरून परीक्षा घेण्यात आली. ज्यांनी ती पाहिलीच नाहीत किंवा ज्यांना ती कळलीच नाहीत ते सर्व उत्तीर्ण घोषित केले गेले. ज्यांना ती कळली अशा मुलांना brain service center मध्ये ब्रेन वॉशिंग साठी पाठवण्यात आले. ही अशी तडफ आपल्या महाराष्ट्रात कधी

दिसेल याची मोरू वाट पाहात होता. तो क्षण आज आला आणि मोरूची छाती अभिमानाने भरून आली.

मोरू जात्याच कायदेपालन करणारा. त्यामुळे कधी नेभळट तर कधी बावळट म्हणून ओळखला गेला तरी त्याला त्याची पर्वा नव्हती. कुठलीही गोष्ट करण्याआधी ती कायद्याच्या चौकटीत बसते की नाही याचा तो शंभरदा विचार करी. त्यामुळे कधी कधी ती गोष्ट करायची वेळ निघून गेली तरी बेहत्तर पण बेकायदा काम काही करणार नाही असा त्याचा पण होता. 'कायदा पाळा गतिचा, थांबला तो संपला' हे वाचून एकदा सिग्नलला न थांबता त्याने आपली स्कूटर पुढे नेली. तेव्हा वाहतूक पोलिसाने अडवले असता त्या कवीच्या कायद्यापेक्षा खरा पोलिसी कायदाच पाळावा एवढा व्यवहार त्याला समजला होता. त्यानंतर त्याने हा गुन्हा रात्री बारा वाजले तरी आपली स्कूटर चालवताना केला नाही. एकदा कोणत्यातरी नातेवाईकास पहावयाला जसलोक हॉस्पिटलात रेल्वेने जाताना तिकिटास खूप गर्दी होती तेव्हा नाइलाजाने त्याला विनातिकीट जावे लागले. तर येताना त्याने दोन तिकिटे काढून त्याची भरपाई केली. खरंतर जाऊन तिकिटचेकर कडे दंडच भरला असता पण मागील अनुभवांवरून तो एवढे शिकला होता की नुसताच कायदा मोडून भागत नाही तर तसे करताना पकडले पण जायला हवे. तिकीटचेकर त्याला धुडकाऊन लावील याची त्याला खात्री होती म्हणून ही दोन तिकीटांची शिक्षा त्याने स्वत:लाच ठोठावली होती.

मोरू अस्वस्थ झाला. आपल्याकडून अजून काही कायदे भंग जाणता अजाणता झाला काय? त्याला काही सुचेना. विचार करून करून तो दमला. लहानपणी एकदा शाळेच्या परीक्षेत त्याने समोरच्या मुलाची उत्तरे बरोबर आहेत की नाहीत एवढे पाहण्यासाठी त्याच्या बाकावर मागून डोकावले होते, म्हटलं तर एक प्रकारची कॉपीच ती. नंतर कित्येकदा रेल्वेच्या गर्दीत फुटबोर्डावर उभे राहायला लागले होते त्याला, काही वेळा

रेल्वे बंद असताना गाडीतून उड्या टाकून नाइलाजाने त्याने रेल्वे रूळांवर ही पाऊले टाकली होती. तो गुन्हा आहे हे माहित असूनही. कधी कधी पेपरातल्या बातम्या वाचून त्याला एखाद्या राजकारण्याला संपवावे असे ही मनातून वाटले होते. काहींच्या बाबतीत तर त्याला नेहमीच असे वाटत आले होते. हे सर्व बेकायदेशीर आहे हे माहित असूनही असे विचार मनात येण्यापासून तो थांबवू शकत नसे. मोरू एकदम confession मोड मध्ये आला. त्याला वाटले की पोलिसांना शरण जावे आणि आपल्या आतापर्यंतच्या सर्व गुन्ह्यांची कबुली देऊन टाकावी. पण नुसता गुन्हा करून भागत नाही तर तो करतानाच कोणी तरी पाहणे किंवा तो करतानाच पकडले जाणे जरूरीचे आहे हे त्याला आतापर्यंत माहित झाले होते. पोलिसांनी त्यालाच वेड्यात काढले असते.

थकून भागून मोरू रात्री अंथरूणात पडला. समस्येच्या मुळाशी जाण्याची त्याची सवय होती, त्या फेसबुकावरील मुलींच्या हातात ना बंदूक ना तलवार. कॉम्प्युटर वर लिहिल्याने तशी लेखणी पण त्यांच्या हाती नव्हतो. बाकीचे कार्टूनिस्ट पण हाती लेखणी घेऊनच कायदेभंग करत होते. म्हणजे या सर्वांच्या मुळाशी हीच लेखणी आहे. कायदे पाळायचे तर तिचेच उच्चाटन करावयास हवे. लोकं शिकले की बिघडतात. विनाविनय कायदेभंग करतात. हाती पेन आले की त्यांना कसला धरबंद राहात नाही. निरक्षरांना विशेष विचार नसल्याने ते असला बेकायदा व्यवहार करूच शकणार नाहीत. साक्षरते ऐवजी निरक्षरतेचा प्रसार यासाठी गरजेचा आहे. कायदेकानूंच्या पालनात निरक्षरतेला पर्याय नाही. साक्षात्कार व्हावा तसा हा विचार मोरूला सुचला आणि एका समस्येचे मूळ उकलल्याचा आनंद त्याला झाला. त्या आनंदात त्याच्या कायदेपालक हृदयाला अपार शांती मिळाल्यासारखे वाटले आणि समाधानाने मोरू गाढ झोपी गेला.

रात्री मोरूला स्वप्न पडले. शाळाशाळांतून आईबाप मुलांची नावे काढून टाकत आहेत. आजपर्यंत 'लिहा वाचा मोठे व्हा' म्हणणारे आईबाप अचानक 'लिहू नये वाचू नये गपचुप बसावे' का खेळताहेत यावरून मुलं गोंधळून गेली आहेत. आजपर्यंत जे शिकलात ते

विसरून जा म्हणून आईबाप मुलांच्या पाया पडताहेत. काही करा पण लिहू नका असा टाहो मुलांच्या आया फोडताहेत. मुलं कायमची शाळा सुटली म्हणून पाटी फोडून मजेत धावत सुटली आहेत.

सकाळी उठला तेव्हा मोरूला हलके हलके वाटत होते. शेवटी एका मोठ्या समस्येचे निराकरण झाले होते.



३

# वारस, वारसा, परंपरा, संस्कृति इ.

आपला समाज अगदी समृद्ध वारशाचा आहे. वारसा हा आपला अगदी संवेदनशील विषय आहे. बाकी काही होवो, आजची एखादी गोष्ट नाहीशी होवो तरी बेहेत्तर पण वारशाला कुणी हात लावू नये म्हणून आम्ही अगदी सजग असतो. व्यक्तिगत पातळी वर वारसाची आणि समाज पातळीवर वारशाची काळजी.

गोरा साहेब कधीच गेला पण जाताना दोन गोष्टी वारशात सोडून गेला. पहिली म्हणजे गोऱ्या रंगाचे चिरंतन  आकर्षण. आपले राम आणि कृष्ण सावळे असोत पण आम्हाला गोरा रंगच सुपिरियर वाटतो. देशांतर्गत गोऱ्या वर्णात मोडणारे लोक जास्त हुषार आणि खऱ्याखुऱ्या गोऱ्याची तर बातच नको. त्यांनी काही सांगितले तरी आपण मान्य करणार. किंबहुना आपण स्वत: साठी सर्टीफिकेट पण गोऱ्यांकडूनच शोधणार.

दुसरा वारसा अर्थातच इंग्रजी चा. कोणी कधी त्या भाषेस वाघिणीचे दूध म्हटले तर आमच्या धुरिणांनी ते फारच मनाला लावून घेतले. दररोज त्या दुधाचा रतीब घरोघरी लावावा म्हणून मराठी शाळाच बंद पाडायचे ठरवण्यात आले. त्यातून आजचे चिल्ड्रन्स शाळेत न जाता स्कूलमध्ये जायला लागले आणि त्यांचे मम्मी पपा मोठ्या कौतुकाने 'येरेयेरे पावसा' ऎवजी 'रेन रेन गो अवे' ऎकू लागले. मुलांना स्टडी बरोबर एक्स्ट्राकरीक्युलर म्हणून क्लासेस लावू लागले. इंग्रजी फाडफाड बोलणाऱ्याचे कोण कौतुक. नुसता इंग्रजी बोलणारा ही सुशिक्षित समजला जाऊ लागला. कुणी पुढारी मंडळी परदेशातून आल्यावर 'तिथली मुलं हुशार हो, अगदी लहान लहान मुलं पण इंग्रजी बोलतात' म्हणून कौतुक सांगू लागली. पॅकिंगच्या ह्या जमान्यात विचारांपेक्षा त्यावरील भाषेचे आवरण महत्त्वाचे. कव्हर इंग्रजीचे असले की त्यातील विचार दुय्यम. गोऱ्या साहेबाचा हा वारसा कित्येक वर्ष आम्ही जिवापाड सांभाळतो आहोत.

गोऱ्या साहेबाने सामाजिक शिस्त, वक्तशीरपणा असे मागास विचार देण्याचा प्रयत्न केला पण आमचा स्वाभिमान जागा झाला. आम्ही ते सर्व बाणेदारपणे नाकारले. तिथे आमचा पूर्वीचा बेशिस्तीचा वारसा आम्ही जिवापाड जपतो आहोत. आता काही बुरसटलेले लोक म्हणतात की आपण समाजात वावरताना काही सभ्यता पाळली पाहिजे, वेळेचे बंधन पाळले पाहिजे. अन्यांचा आदर केला पाहिजे. पण त्यांची संख्या अगदी मर्यादित. त्यांच्याकडे आम्ही लक्ष देत नाही.

आम्ही परंपरा पाळतो. आता उदाहरणार्थ 'लेकी बोले सुने लागे' ही आमची एक उज्ज्वल परंपरा. केवळ त्याकरता म्हणजे सून यावी याकरता मुलगाच व्हावा याचा हट्ट होतो. अर्थात सुनेला टोचण्यासाठी बोलायला लेकींचे महत्त्व ही आमच्या परंपरेत तितकेच आहे. आता मर्यादित कुटुंबात सून असली तरी बोलायला लेकच नसेल तर ही परंपरा मोडीत निघायची भीती आहे. त्यात परत सुनेला सासू टोमणे मारते एव्हढे तरी सामान्य आकलन व्हायला पाहिजे नाहीतर तिला ते लेकीलाच बोलले असे वाटले तर सासूचे टोमणास्त्र निष्प्रभ व्हायचे. त्यामुळे सुनेचे किमान शिक्षणही महत्त्वाचे. म्हणजे स्त्री शिक्षणाचा पुरस्कार ही या परंपरेतून करता येऊ शकतो. सांगायचा मुद्दा आम्हाला परंपरा प्रिय आहेत. हुंडा देणे घेणे सरकारने बंद केले. आमचे पुरोगामी तो घेतच नाहीत पण परंपरा पाळायची तर थोडे एक १०-२० तोळे सोने आणि एखादी गाडी दारासमोर उभी करून दिली तर कसे परंपरेस धरून न्ह्यायल्या सारखे होते.

एखादा रोहन किंवा राजेश त्यासाठी थेट अमेरिकेतून एक दीड महिन्याची सुट्टी घेऊन इथे येतो.

'आज रात्री जायचे बरं साडेतीन वाजता एअरपोर्ट वर. फ्लाईट लेट नसली तर मिळवली. '

रोहन ५ वर्षांपूर्वी अमेरिकेत गेला तेव्हा त्याची आई त्याला 'विमानतळावर' सोडायला गेली होती आता घ्यायला मात्र 'एअरपोर्ट'वर. ती कौतुकाने शेजारणीला सांगते,

'रोहन येतोय दीड मंथच्या व्हेकेशन वर. त्याला जास्त व्हेकेशन नाही मिळत ना. त्यात सगळे उरकायचे म्हणजे मुलगी बघणे, एंगेजमेंट आणि म्यारेज पण. मग दोघं डायरेक्ट अमेरिकेतच सेटल होणार. '

त्याच्या लग्नाची जय्यत तयारी. म्हणजे मुलगी पाहून साखरपुडा नि लग्न उरकून दीड महिन्यात परत अमेरिका. त्यासाठी आधीच जाहिरात देऊन मुलींची शॉर्ट लिस्ट केलेली. जाहिरात पण कशी? 'अमेरिकास्थित मुलास गृहकृत्यदक्ष गोरी शिकलेली मुलगी पाहिजे' वगैरे. वास्तविक तिकडे ओरिजिनली गोरी मुलगी मिळू शकते किंवा तिथे राहणारी एखादी भारतीय पण. पण ही हुंड्याची परंपरा ओरिजिनल गोऱ्यांना समजणार कशी? आणि तिकडचीच कोणी मुलगी असली तर आपल्याला पुरोगामित्वावर प्रश्नचिन्ह उठायची भीती. त्यापेक्षा इकडील बरी. एकतर तीही इकडची इंडियन म्हणजे गोऱ्यांच्या देशांतून आलेल्या फॉरेन रिटंर्ड ला दबणारी. परत गृहकृत्यदक्ष असायची शक्यता असलेली. अर्थात पूर्वी गृहकृत्यदक्ष मुलगी म्हणजे कमी शिकलेली चालेल पण घर नीट सांभाळणारी हवी असा अर्थ होता तर आता तो बदलला. आता गृ. कृ. द. म्हणजे शिकलेली अगदी डबल ग्रॅज्युएट हवी पण मुलाची किंवा मुलाकडच्यांची इच्छा असेल तर नोकरीबिकरी सोडून आणि शिक्षण वगैरे विसरून हसत हसत घरी बसायला तयार असेल अशी असा आहे. थोडक्यात मुलगी गोरीच हवी आणि संस्कृती सांभाळणारी हवी. नाहीतर परंपरा बुडायची शक्यता. हाडाचे भारतीय हे होऊ देत नाहीत. वारसा, परंपरा आणि संस्कृती म्हणजे आमचा प्राण. तो जाईल पण आम्ही वारसा जपणारच.

मग कुणा रेवतीशी लग्न जमते. रेवतीचे आई बाबा कृतकृत्य होतात. अमेरिकेला साजेशा थाटामाटात लग्न होते. परंपरा पाळायची म्हणून जास्त नाही तरी ३०-४० तोळे सोनं दिलं जाते.

'पोरीने नशिब काढले हो. तिचे मिस्टर अमेरिकेत असतात. '

रेवतीची आई तिच्या शेजारणीला कौतुकाने सांगते. आणि स्वत: पुण्या मुंबईबाहेर गेली नसेल तरी पुढे बाळंतपणासाठी अमेरिकेला जायची मानसिक तयारी करायला लागते. रेवतीला मुलगाच व्हावा हा सांस्कृतिक अट्टाहास रोहन आणि रेवती दोघांच्याही आयांचा असतो. वारस आणि वारसा दोन्ही महत्त्वाचे. काही झाले तरी शेवटी आम्ही भारतीय. वारस, वारसा, परंपरा आणि संस्कृती जिवापाड जपणारे. कालांतराने

रेवती बाळंत होते. पहिली मुलगीच झाली म्हणून सुतक नाही तरी सुतकी चेहरा करण्याची परंपरा अमेरिकेतही पाळली जाते. रेवती आणि तिच्या आईलाही अपराधी वाटत राहते. दोन्ही कुटुंबे सुसंस्कृत असल्याने 'पहिली बेटी धनाची पेटी' म्हणत एकमेकांचे सांत्वन करतात. त्यातल्यात्यात रेवतीची मुलगी रोहनवर न जाता रेवतीप्रमाणेच गोरी असल्याने सुटकेचा नि:श्वास टाकतात.

पुढे मग वारसाची वाट पाहणे आले. मधल्या काळात रोहनची आई जेव्हा केव्हा अमेरिकेत जाईल तेव्हा यावरून 'लेकी बोले सुने लागे' ची परंपरा पाळायचा प्रयत्न करते. रेवती इंग्लिश मिडियम मध्ये शिकल्याने तिला सासूचे तिरकस मराठी कळत नाही. सासूला इंग्रजी 'मॉर्निंग मॉर्नंग हू ह्याज कम तडमडायला' अशा टाईपातले येत असल्याने ती इंग्रजीत टोमणे मारू शकत नाही. सासूच्या खाष्टपणाची परंपरा सांभाळता न आल्याने सासू नाराज होते आणि दु:खद अंत:करणाने परतते. पुढे रेवतीला मुलगा होतो. घराण्याला वारस मिळाल्याने सगळीकडे आनंदीआनंद होतो. पेस्ट्रीज वाटून तोंड गोड केलं जाते. रेवतीची आई या वेळी समाधानाने इंडियात परतते. वारस मिळाला, वारसा सांभाळला, परंपरा आणि संस्कृतीचे जतन झाले म्हणून सगळीकडे आनंदीआनंद होतो.

४

## गाढवाचे लग्न!

गाढव गाढवीच्या घरी एका गाढवीच्या पाठी गाढवाचा जन्म झाला नि सगळीकडे आनंदीआनंद झाला. तो गाढवाच्या जन्माहून जास्त परत एक गाढवी न जन्मल्याचा होता. पुढे आपल्या वंशाला चालवणारा दिवा मिळाला म्हणून आई नि बाबा गाढव हरखून गेले. अत्यानंदाने वडील गाढवांनी लाथा झाडल्या, आपल्या भसाड्या आवाजात आनंदी गाणे गायले. खायच्या गवतात आज गूळ आहे नि त्या गुळाची चव ही त्यांना गोड आहे हे जाणवले.

बाकी काही असो पण गाढवी होऊ नये याबाबत आई नि वडील गाढवांचे एकमत होते. गाढवराज्य म्हणजे गर्दभपुरात गाढवीचे लग्न हा मोठाच कठीण प्रश्न होता. चांगल्या गाढवाच्या पदरी बांधायचे तर तिचे लग्न होईपर्यंत जीवतोड मेहनत करावी लागायची. मग दिलवाले गाढव येऊन गाढवी दुल्हनिया तिच्या सकट काही संपत्ती आणि दोन किलो गूळ घेऊन जायचे. गर्दभराज्यात हीच प्रथा होती. आणि प्रथा व रितीरिवाज म्हणजे म्हणजे सर्व गाढवांचा मानबिंदू होता. त्यात गाढवीकडच्यांना अशी वागणूक मिळणे कोणत्याही गाढवीच्या आईबापासही गैर वाटत नसे. ते फक्त आपल्या नशिबास बोल लावत बसत आणि आपल्या गाढवीच्या लग्नाच्या तयारीसाठी पैसा साठवायच्या तयारीस लागत. गाढवी जन्मानंतर गावात गाढवी जन्म सोहळा असे. गाढवी जन्मली की आजूबाजूची गाढब कुटुंबे जमत. सर्व एका वेळी लाथा झाडत. नंतर रूदनाचा कार्यक्रम असे. कोठे गाढवी जन्मास आल्याचे त्यामुळे सर्वांना कळे. तिच्या बारशाच्यावेळी सारे फेर धरून गाणे गात,

नकोस तू नकोस तू

नकोस तू आम्हा नकोस तू

अशी कशी अवदसा

करी घरादाराची दशा

कोणाकोणालाही नकोस तू

आपणच जन्माला घातलेल्या त्या हाडामांसाच्या गोळ्यासमोर रडक्या आवाजात गाणी गाऊन तिचे स्वागत केले जाई. हे सर्व करण्यात आजूबाजूच्या घरच्या गाढवींचा पुढाकार असे नि ती त्यांची जबाबदारीही असे. आजपर्यंत ती त्या समर्थपणे पाळत आल्यानेच गर्दभसंस्कृतीचे जतन होत आले होते. गाढवी पण लहानपणापासून हे सर्व पाहातच मोठी झाल्याने तिला पण हे सारे अंगवळणी पडत असे. यालाच गर्दभराज्यात संस्कार म्हटले जाई. मग मोठी झाल्यावर ही प्रथा पुढे चालवायला तीही हातभार लावीत असे. राज्यात लग्नाच्यावेळी विवाहतुला नावाचा विधी असे. त्यासाठी एक विवाह तराजू असे. एका तागडीत तो विवाहोत्सुक नवरा बसे. दुसऱ्यात नवरी गाढवी. मग त्यांच्या वजनातील फरकाएवढ्या गोष्टी ठेऊन दोन्ही तागडी समान पातळीवर आणून विवाह लावून दिला जात असे. हा फरक भरायची जबाबदारी गाढवीच्या आईबापांचीच असे. त्यामुळे ज्याच्याघरी गाढव जन्मे त्याच्या घरी आनंदोत्सव आणि गाढवीजन्मानंतर शोक हा गर्दभराज्यातील नियमच होता. गाढवाचे वजन वाढून त्या विवाह तागडीतील फरक वाढावा याचा त्याचे आईवडील त्याचे भरपूर लाड करत, त्याला चांगलेचुंगले खाऊ घालत. गाढवीच्या घरी पण हाच प्रयत्न चाले पण तिच्या विवाहतागडीत भरण्यासाठी संपत्ती संचयात तिचे आईबाप नि ती गाढवी उपाशी राहात नि पै पै साठवीत. त्यामुळे गाढवी कुपोषित राहात. असे असताना गाढवीजन्माबद्दलची प्रथा लोकांना अगदी योग्यच वाटे हे खरे. गाढवी नकोशी वाटणे स्वाभाविकच आणि गाढव पोटी येणे अगदी मुक्ती मिळण्यासारखेच होते त्या गर्दभपुरात. आपल्या कर्जमुक्ती करता एक तरी गाढव पोटी यावा याबद्दल आईबाप प्रयत्न करीत. मनुष्यप्राण्याइतका प्रगत गाढव समाज नसल्याने त्यात त्यांना यश मिळत नसे. त्यामुळे काही गाढव कुटुंबे दोन तीन गाढवींच्या जन्मानंतर देशोधडीला लागल्याशिवाय राहात नसत. गाढवीला जन्माला घातल्याची ही शिक्षा व्हावयालाच हवी असे त्या गाढवींच्या आईबापासह सर्व गाढवांस वाटे. असा तो समाज एकसंध आणि एक दिलाने राहाणारा होता. रूढी आणि परंपरांचा अभिमान बाळगणारा

होता आणि त्यासाठी आपल्या प्रजेतील गाढवांस जन्म देणाऱ्या माता बनतील अशा गाढवींना हीन लेखणे त्यांच्या संस्कृतीत महत्त्वाचे होते. मानवाकडे कामाला राहून राहून त्याने हे सर्व शिकले होते. संस्कृतीतील आदानप्रदानावर त्यांचा विश्वास होता.

आपला कथानायक जन्मला तेव्हा पण असाच आनंदोत्सव झाला होता. त्या नादात तो एका पायाने अधू आहे याकडे दुर्लक्ष झाले. मागील पाय म्हणजे लाथा झाडण्याचा मुख्य अवयवच अधू असल्याचे लक्षात आले तेव्हा प्रथम त्याच्या आईवडीलांना धक्का बसला. त्या पायाचे वजन विवाह तराजूत कमी भरेल खरे पण पण काही झाले तरी तो एक नर गाढव होता. लग्नाच्या बाजारात त्याचे पारडे जडच राहाणार हे नक्की होते. त्याचे राहिलेले तीन धड पाय नि त्यावर चे धड याचे वजन वाढावे याचा प्रयत्न त्याचे आईबाप करत होते. त्याच्या वजनावरच त्यांची लग्नानंतरची पत ठरणार होती.

गाढव समाजाने अजूनही काही रीती मानवाकडे काम करताना शिकून घेतलेल्या होत्या. त्यात मानव ज्यांना हलके काम समजतो त्या हलके काम करणाऱ्याकडे काम करणाऱ्या गाढवास हलक्या जातीचे मानले जाई. जातपात हा तर त्या समाजाचा मानबिंदू होता. लग्नात गाढवीबद्दल फार अपेक्षा नसत.

माझिया जातीची मिळो मज कोणी

नाही अजून काही मागणी

असा दृष्टीकोन त्यांचा होता. काही गाढवे हुशार होती. त्यांचा रंग थोडा उजळ असे आणि आवाजात त्यातल्या त्यात गोडवा असे. अशांना श्रेष्ठ मानले जाई. काही शूर असत त्यांची शूर जात मानली जाई. इतर व्यापाऱ्यांकडे काम करणारी गाढवे स्वत:स ही व्यापारी म्हणवत. हलकी कामे करणाऱ्यांकडे काम करणारी गाढवे हलक्या जातीची समजली जात. प्रत्येक गाढवास आपापल्या जातीचा अभिमान वाटे. एका जातीतील गाढवाचे दुसऱ्या जातीतील गाढवीशी लग्न लागणे म्हणजे घोर अनाचार असे गर्दभ राज्यात समजले जाई. गर्दभराज्यातील कायदेकानू कडक होते. नीतीमत्तेची चाड म्हणून आपापल्या जातीची

शुद्धता टिकवली जाई. आईबाप वारसा बाकी कसला देवोत न देवो, जाती मात्र आपल्या गाढव नि गाढवीं कडे संक्रमित करीत. गाढवींना तर वारशात हीच एक गोष्ट मिळत असे.

आपल्या कथानायकाचे लग्नाचे वय झाले नि त्याच्या आईबापास समृद्धीची स्वप्ने पडू लागली. पायाने अधू झाला तरी अंगाने मजबूत असल्याने वजनात तो चांगलाच भरेल. त्यातल्या त्यात जास्तच कुपोषित गाढवी असेल तर आपल्या नशिबी चांगलीच श्रीमंती आहे अशी त्यांची खात्री होती. वधूसंशोधन सुरू झाले. कृश गाढवींस जास्त पसंती मिळेल असे ठरवले. काही फेंगड्या पायाने चालत तर काहींच्या शेपट्या हव्या तेवढ्या लांब नसत म्हणून त्यांना नापास ठरवले जाई. वधूपरीक्षेस सर्व गोतावळा जाई. त्यातील कोणास काही पटत नसले तर सरळ नकार जाई. म्हणजे नवऱ्याच्या मावशीच्या नवऱ्याच्या बहिणीच्या नणंदेला गाढवीच्या शेपटाची लांबी जरा जास्त वाटली तरी ती गाढवी नाकारली जाई. सर्वानुमते होईल तोच निर्णय, फक्त त्यात गाढवाचे मत मात्र विचारात घेतले जात नसे, यालाही कारण होते.

कथानायक गाढव पायाने अधू असला तरी एका शिक्षकाकडे कामास होता. त्याचे विचार जाता येता कानावर पडून गाढवास आपल्या गाढवपणातील गाढवपणाची जाण येऊ लागली होती. जे काही परंपरेच्या नावे चालू आहे ते सारेच खरे नाही नि बरेही नाही असे त्याच्या मनाने घेतले होते. आजवर त्याचे आईबाप जी स्वप्ने पाहात होते त्यांना हा मोठाच धक्का होता. विवाहतुला नको नि जातीपातीचे बंधन नको असे त्याने म्हटले तर त्याच्या आईने अंथरूणच धरले. त्याची मोठी बहीण लग्न होऊन गेलेली. तिच्या वेळचा सारा खर्च भरणारा हा कोरा चेक म्हणजे गाढव होता. त्यानेच असे तोंड फिरवावे? घरादाराची धूळधाण करणारे विचार त्याच्या मनी यावेत? शेवटी त्याच्या आईची समजूत घालून तिला वधूसंशोधनास तयार केले. त्यातून नायक गाढवास बाद करून बाकी सर्व गाढवी बघायला जात. गाढवीच्या घरी लाचार आईबाप त्यांचे स्वागत करीत. आपल्या लाचारीने दया येऊन आपल्या गाढवीस होकार मिळावा नि झालेच तर काही संपत्तीदानातून दयाळू पणे सूट

मिळावी म्हणून हा लाचारीचा घाट घातला जाई. त्यात पण प्रत्यक्ष नवरा गाढव नसला तरी चालून जाई.

अशा चोखंदळपणातून एकच झाले. आवडलेल्या गाढवीकडे द्यायला संपत्ती नसायची आणि जिच्याकडून काही मिळायची शक्यता असे ती कोणा ना कोणाला पसंत पडत नसे. भर पावसात घोंगडे भिजत पडावे असा हा वधूसंशोधनाचा कार्यक्रम झाला होता. त्यातून कंटाळून गोतावळ्यातील एकेक माघार घेऊ लागला नि शेवटी त्या गाढवाचे फक्त आईबापच उरले वधू संशोधनास. गाढवाचे सर्व गोष्टींत बारीक लक्ष होतेच. आजपर्यंत लग्न ठरायचे काही टेन्शन त्याला नव्हते कारण एवढ्या लटांबरातील कोणीना कोणी मोडता घालेलच याची खात्री होती, पण जसे फक्त त्याचे आई वडील उरले तशी त्याच्या छातीत धडकी भरली.

गाढवाने शेवटी ठरवले. पायाने अधू असला तरी मनाने तो चांगलाच मजबूत होता. सारे गाढव त्या गर्दभेश्वराची निर्मिती असतील तर कोणी उच्च नि कोणी नीच ही विभागणी काही त्याच्या पचनी पडेना. गाढवीच खरा वंश चालवत असताना गाढवास वंशाचा दिवा मानावे नि त्या गाढवींस हीन लेखावे यातील मर्म त्यास कळेना. त्याच्या आवडीची एक तथाकथित हलक्या जातीची गाढवी होती. ती प्रथम लग्नास तयार होईना पण तिला पटवून त्याने लग्नास तयार केले नि लग्न उरकूनच एके दिवशी तो घरी परतला. दोघे घरी आले तर एकच हलकल्लोळ माजला. रिकाम्या हाताने विवाह तुला न होताच लग्न, त्यात पुन्हा जात पात पाहाणे नाही. त्याच्या आईस तर धक्का बसून भोवळ आली. बापास समजेना काय करावे. आपले तोंड कुठे लपवावे असे गाढव कुटुंबास झाले.

गर्दभपुरातील पंचायत बसली. सारे गंभीर चेहऱ्याने बसले होते. आजवर न झालेले, अघटित झाले होते. एक बुजुर्ग गाढव उठले नि म्हणाले,

'हा आपल्या समस्त गाढव प्रजातीच्या इज्जतीचा प्रश्न आहे. असे कधी आधी झाले नाही नि परत कधी होऊ नये याकरता आपण आजच उपाय योजला पाहिजे. आजच याचा बंदोबस्त झाला नाही तर हा विषवृक्ष फोफावेल. '

'खरे आहे. बंदोबस्त अगदी लगेच झाला पाहिजे. '

समस्त उपस्थितांनी माना डोलावल्या.

'आपल्या पूर्वजांना काय अक्कल नव्हती अशा प्रथा पाडायला? हे आजच कोण निघाले की कोणा शिक्षकाकडे काम केले म्हणून अक्कल यायला. स्वत:स अतिशहाणे समजता काय?'

मग काय बंदोबस्त व्हावा याचा विचार सुरू झाला.

एक सरकारी कार्यालयात कामाला असणारे गाढव म्हणाले, 'आपण तीन गाढवाची समिती नेमूया. तिघांनी मिळून या समस्येचा विविध अंगानी विचार करावा नि उपाय सुचवावा. फक्त हे काम लवकरात लवकर होणे गरजेचे. '

सरकारी कचेरीतील गाढवाला वेगळाच मान होता. त्यामुळे सारे कान देऊन ऐकू लागले.

'यांचा जो अहवाल येईल त्याप्रमाणे ही पंचायत कृती करण्यास बांधील राहिल. तसे निर्देश ती मग देईल. '

सरकारी शब्दांच्या नुसत्या उच्चारानेच सारे भारावून गेले. समिती बसली. दोन दिवस त्यांच्या रात्रीपर्यंत बैठका झाल्या.

तिसऱ्या दिवशी सारे परत जमले. सरकारी गाढव त्या समितीत होते, एक न्यायालयातील वकीलाच्या घरी कामाला असणारे होते नि तिसरे वयाने बुजुर्ग म्हणजे ऐकताही नीट येणार नाही असे तिसरे सदस्य गाढव होते.

'झाड तोडायचे असेल तर घाव मुळाशी घालावा लागतो, ' सरकारी गाढव गंभीर पणे म्हणाले. 'नुसत्या फांद्या कापून चालायचे नाही. '

'खरे आहे ते. ' सारी उपस्थित गाढवे म्हणाली. काहीतरी नक्कीच उपाय निघाला असावा अशी खात्री त्यांना वाटत होती.

'मुळापासून म्हणजे नामशेष. बंडखोरी आजच मोडून काढावी लागेल. आणि ती परत होऊ नये अशी शिक्षा दोषींस झाली तरच हे होऊ शकते. '

साऱ्या सभेत शांतता पसरली.

'ज्या गाढवाने हे कृत्य केले त्यास नामशेष करा. ना रहेगा बास न बजेगी बासुरी. त्यातही त्या गाढवीची चूक जास्त मोठी आहे. ती अशा लग्नास तयारच कशी होऊ शकते? दोघांचा अंत आज आताच आपली पंचायत करेल असा आमचा निर्णय झाला आहे. '

सभा सुन्न झाली पण ती क्षणभरच. त्या नंतर सर्वांनीच त्या समितीच्या या निर्णयाचे कौतुक केले. सभा संपेपर्यंतच मध्यरात्र उलटली होती. सभेचा मोर्चा गाढवाच्या घराकडे वळला. जमाव झाला की त्याची हिंस्त्रता अनेक पटींनी वाढते. भर मध्यरात्रीच्या त्या हल्ल्यात अधूपायांवर उभा राहात गाढवीला वाचवायचा आटोकाट प्रयत्न गाढवाने केला. जमावास पण गाढवीसच प्रथम मारायचे होते म्हणून काही काळ त्या गाढवाच्या बचावापुढे गाढवी तग धरून राहिली. पण त्या जमावाच्या ताकदीपुढे काय कोणाचे चालणार? गाढवीचा अंत झाल्याचे पाहून गाढव जमेल तसे आपल्या तीन पायावर धावू लागले. पण जमावाला देऊन देऊन किती हुलकावणी देणार? अंत अटळ होता. एक बंड मोडून काढले गेले, अगदी मुळापासून. गर्दभपूर पुन्हा पवित्र झाले.

गर्दभपुरात आजही कित्येक वर्षांनी ही गोष्ट सांगितली जाते. सर्व गाढवांच्या पिढ्यांपुढे आदर्श ठेवला जातो. त्या गाढव गाढवींची गाढवांनी एक समाधी बांधली.

कोणाला त्याचे आश्चर्य वाटेल पण त्या गाढव गाढवींचे बलिदान वाया जाऊ दिले नाही. त्या समाधीवर लावलेला बोर्डच सारे काही सांगून जातो :

'गर्दभपुरातील मान आणि शान जपण्यासाठी यांनी आपले प्राण अर्पिले. यांचे बलिदान गरजेचे होते. यांच्या नंतर या गर्दभपुरात असे ना कधी घडले ना कधी घडेल. आपल्या राज्याची प्रथा आणि परंपरा काटेकोर पणे पाळली जावी म्हणून या गाढव गाढवींचे बलिदान झाले. त्यांच्या या बलिदानाचा निर्णय घेतलेल्या त्या द्रष्टा पंचायत सदस्यांस त्रिवार सलाम. गर्दभपुराचा विजय असो! '

ही समाधी आज एक प्रसिद्ध पर्यटन स्थळ आहे मानवासाठी. गर्दभपुरातील त्या समाधीचे मानवाला कोण कौतुक. जात पात भलेही गाढव मानवाकडून शिकले असेल पण तिच्या रक्षणाचा, उच्च नीचतेचा नि सामाजिक विषमतेसाठी बलिदानाचा आदर्श मात्र गाढवांनीच घालून दिला आहे. त्या समाधीच्या दर्शनास मानवजात लांबलांबून येऊन गर्दी करते आणि मनात नवा विचार घेऊन जाते. आजही मानवाच्या गावात असे काही बंड झाले तर गर्दभपुराचाच आदर्श ठेवला जातो.

५

## चिंग्या महिन्याचा होत नाही तोच

*( चिंगी महिन्याची होत नाहीत तोच नावाची दिवाकरांची एक प्रसिद्ध नाट्यछटा आहे. त्या काळी मुलीच्या जन्मताच तिच्याबद्दलचे स्वप्न पाहणाऱ्या बापाचे वात्सल्य दिसत असेलही पण आजच्या काळात कोणी चिंगीच न जन्मावी म्हणून प्रयत्न करणाऱ्यांची संख्या वाढते आहे. त्या ऐवजी चिंगा जन्माला घातला जातो. तो जन्मला की त्याच्या बापास धनाचा पेटारा मिळाल्याचा आनंद होतो. त्याच्याकडून पुढे हंडा भरून येणारा हुंडा खुणावू लागतो. अशाच एका चिंग्याच्या जन्मदात्याची हे स्वगत. )*

अपत्य प्राप्तीचे सुख काही वेगळेच असते खरे. अपत्य म्हणजे मुलगाच बरे. म्हणजे आम्हाला हे काही पहिलेच अपत्य झाले असे नाही. आम्हाला पहिली मोठी कन्या आहेच पण आपला म्हणावा असा तो म्हणजे मुलगाच नाही का? यावेळी तरी मुलगाच जन्मला म्हणून कसे सारे धन्य वाटले. खरे सांगू का तर आपली पुण्याई फळाला आल्या सारखे वाटले आम्हाला. मागच्या वेळेचा आईचा सारा रुसवा कसा क्षणात नाहीसा झाला. मला अजून आठवतेय आमची सुकन्या जन्मली तेव्हा आईने रडायचे बाकी ठेवले होते. साहजिकच आहे. शेवटी आपल्या संस्कृतिचा प्रश्न आहे हा. आपण नाही तर कोण पाळणार? अर्थात यावेळी पुत्ररत्न झाले ते काही एवढ्या सहजपणे नाही. सरकारने काय काय बंद्या आणल्या, सोनोग्राफीवर काय आणि याच्या त्याच्यावर काय. बंदी आणली तर त्या डॉक्टरांनी आपले भाव आणखीन वाढवले. खर्च खूप झाला, म्हणजे या आधी दोन वेळा पाहिले, त्या मुली जन्मल्या असत्या तर? अर्थात त्यांच्या लग्नातला खर्च आणि हुंडाबिंडा पकडला तर ती

डॉक्टरांची बिलं परवडली म्हणायची. अर्थात हे आपलं तुमच्या आमच्यातलं सिक्रेट, कारण आपली मतं जुळतात म्हणून, कोणाला सांगू नका, नाहीतर नसती आफत. असो. शेवटी पुत्रप्राप्तीचे सुख नशिबात आहे म्हणायचे एवढेच.

मुलाबद्दल माझी काय काय स्वप्नं आहेत. पुत्र व्हावा ऐसा गुंडा म्हणतात. तिन्ही लोकी हा नक्कीच झेंडे रोवेल बघा. नक्कीच. आज असेल महिन्याचा खरा पण पाहता पाहता मोठा होईल. एवढा मोठा की गुंडा होईल. अगदी झेंडे गाडेल. आमच्या शेजारचे आहेत ना रामभाऊ त्यांचे सांगतो. त्यांना चार मुलींमागे मुलगा झाला. त्यांच्या वेळी आज सारखी डॉक्टरांची मदत नसायची. पाचव्या खेपेला मुलगा झाला तसा रामभाऊंनी जल्लोष केला. पेढ्यांवर थांबले नाहीत तर अख्ख्या आळीला जेवणच घातले. त्यांचा तो उत्साह मला आजही आठवतो. काय तो आनंद! चार मुलींनंतर सुखाचा शिडकावा! आता चौघींची लग्नं झाली. मुलगा अगदी नावाप्रमाणेच गुंडा किंवा गुंड झाला. आता आमच्या एरियातला दादा म्हणून फिरतो. आज बाप हयात असतानाच त्याने त्यास बाहेर काढले घरातून आणि घरावर हक्क सांगितला. बिच्चारे रामभाऊ! येऊन जाऊन आपल्या चार पैकी एका मुलीकडे दिवस काढताहेत. शेवटी मुलीकडे दिवस काढावे लागावे यासारखे दु:ख नाही. या जिण्याचा त्यांना खेद होतो. अजून एखादा मुलगा असता तर अशी वेळ त्यांच्यावर आली नसती. कदाचित त्याने तरी सांभाळले असते असे ते मुलींना सांगतातही. मुली मायेने करतात त्यांचे पण रामभाऊंना मुलांचे कौतुक फार. तर सांगायची गोष्ट, मुलगा तो मुलगाच. अशा पुत्र प्राप्तीचा आनंद आम्हा सर्वांना होणं अगदी साहजिकच आहे की नाही? पहिली बेटी असेल धनाची पेटी पण कितवाका असेना बेटा धनाचा पेटाराच असतो नाही का?

मी ठरवून टाकलंय, याला डॉक्टर करून टाकणार मग अगदी घरचा वैद्य, उगीच दवाखान्यात लायनी लावायला नकोत. नाहीतर इंजिनियर तरी, चांगला सहा आकडी पगार मिळतो म्हणे त्यांना. नाहीतर करेल एखादा मोठा बिझिनेस. अर्थात तो मोठा होईल तेव्हा कशाची चलती असेल त्याचे करेल करियर. आज डॉक्टर इंजिनियराला आहे बक्कळ भाव, चिंग्या मोठा होईल तेव्हाचे कोणास ठाऊक? शेवटी मुलगाच तो. धनाचा पेटारा घेऊन

आणेल कोणत्या तरी मुलीला घरी. तोवर आमच्या सुकन्ये ( सुकन्याच तिचे नाव आहे बरं ) चे लग्न आटोपले असेल त्याच्या आधी. तिच्या लग्नात मात्र माझा हुंड्याला सक्त विरोध असेल. मुलीची बाजू झाली म्हणून काय झालं? समाज सुधारायलाच हवा की नाही? चिंग्याच्या लग्नात मात्र सारं काही प्रथेप्रमाणे यथासांग व्हावं म्हणने झालं. त्यात देणंघेणं काय, हुंडा नि मानपान काय. रीतीबाहेर मी नाही. आपल्या पूर्वाजांनी पाडलेल्या प्रथा आहेत त्या. आपली संस्कृती आहे ती. आपण नाही पाळणार तर कोण पाळणार?

मुलगा झाला म्हणजे कसा वंशाचा दिवा पेटल्या सारखा वाटतो. कृतार्थ झाल्यासारखं वाटतं. मुलगाच आता आपल्याला मुक्ती देईल. अंत्यसंस्काराला तोच तर पुढे येईल. बाकी रामभाऊंच्या मुली त्यांना आयुष्यभर भले सांभाळतील पण शेवटी मुलगाच त्यांना मुक्ती देववेल की नाही. काही तर आईबापांच्या जिवंतपणीच त्यांना मुक्ती मिळेल तर बरं अशीही व्यवस्था करतात. शेवटी काय मुलगा तो मुलगाच. उगीच नाही पूर्वी लोक आशीर्वाद द्यायचे अष्ट्पुत्रा सौभाग्यवती भव म्हणून, म्हणजे एक नाही तर दुसरा कोणी कामाला येईलच. कोणी अष्ट्पुत्री सौभाग्यवती म्हटल्याचं ऐकलंय कुणी? चिंग्याची सर सुकन्येला कशी येणार?

६

## सत्यमेव जयते ( अर्थात सत्याचा विजय नेहमी 'शेवटी' होतो )

सत्यवचन हा एक साथीचा रोग असावा. विशिष्ट डासाच्या चावण्याने तो पसरतो म्हणतात. महापालिकांच्या कृपेने आपला महाराष्ट्र मच्छरोत्पादनात अग्रेसर आहे. गल्ल्या आणि बकालवस्त्यांतून मच्छरोत्पादनाचा धडक कार्यक्रम हाती घेतला जातो आणि बाकी सर्व वेळापत्रकापेक्षा मागे असेल तरी हा एक कार्यक्रम वेळेच्या आधीच संपवून टारगेट अचिव्ह करण्यात वेगवेगळया शहरांतील महापालिकांची स्पर्धा लागते. त्यामुळे ह्या मच्छरोत्पात रोगांची लागण ही या महाराष्ट्र देशी लवकर होते.

मागे ह्या डासाच्या चावण्याने महाराष्ट्राचे उपमुख्यमंत्री आपल्या टगेगिरीची कबुली देऊन बसले. तेथे त्यांच्या मागे कोणी चॅनेलचे बोंडूक घेऊन लागले होते अशातला भाग नाही, पण हा रोगच असा की आपल्या जिभेतून शब्द निसटणारच. राजकारणातील टगेगिरी ही 'पिवळा पीतांबरा'प्रमाणे द्विरूक्ती आहे हे सांगायची गरज नाही. पण सांगणार कोण कोणाला? जणू काही मोठा गौप्यस्फोट व्हावा तसा गहजब माजला. टगेगिरी ही राजकारणातल्या प्रवेशासाठी असलेली किमान आणि एकमेव अट आहे हे ठाऊक असूनही हा गोंधळ नि गदारोळ आपल्या प्रगत म्हणवणाऱ्या महाराष्ट्र राज्याला शोभला का याचा विचार व्हायला हवा. तोच मच्छर मग एका माजी उपमुख्यमंत्रांना चावला तर त्यांनी निवडणुकीतील अतिरिक्त खर्चाची कबुलीच देऊन टाकली. इथेही कोणी काही विचारले नसतानाच. मग परत तेच. म्हणजे गदारोळ नि गोंधळ. सत्य ठाऊक असूनही त्याचे उघड कथन केल्याचा धक्का सर्वांना बसला. धक्का सत्यामुळे नसून ते सांगितले गेल्याने होता हेच कित्येकांना कळले नाही. पेपरवाले सरसावले, चॅनल्सना टीआरपीच्या उकळया फुटल्या, चारदोन टीव्ही तज्ञांची चाराठ दिवसाची चूल यावर पेटली. आम्हाला वस्तुस्थिती कशीही असली तरी चालते पण ती उघड तशी आहे हे मान्य केल्यास आमचा जीव कासावीस होतो. आमचा हा बाणा आम्ही वेळोवेळी दाखवीत आलो आहोतच. त्याचा राष्ट्रीय पातळीवर

प्रचार या निमिताने झाला ही रोजगार हमी योजने नंतरची आपली देशाला दुसरी देणगी. त्यामुळेच हुंडाबळी, स्त्रीभ्रूण हत्या, जातपात, जादूटोणा, अंधश्रद्धा वगैरेत कुठेही मागे नसूनही आपल्या राज्याची प्रगत राज्य म्हणून जाहिरात करता येते.

परवा मंत्रालयात गेलो तर हा डास मलादेखील चावला.

काल माझा मुलगा शाळेत गेला नाही. सकाळी शाळा. त्याला झोपेतून उठवले तर म्हणाला, 'खूप झोप येते आहे. ' मी म्हटले, 'मग जाऊ दे. घे सुट्टी. ' मी असे म्हणालो तर त्याची झोपच उडाली. ताडकन उठून बसला नि म्हणाला, 'नाही. मला कंटाळा आलाय जायचा. ' मी म्हटले, 'ठीक आहे नको जाऊस. ' एवढ्या चटकन सुट्टी मिळाली तर तो एकदम एक्साईट झाला आणि कंटाळा झटकून त्याचा व्हिडिओ गेम खेळायला बसला. त्याचा झटकलेला कंटाळा माझ्या अंगावर पडला असावा कारण मला मग ऑफिसला जायचा कंटाळा यायला लागला. कंटाळा हा डासांमुळे नव्हे तर हवेतून पसरणारा असावा. मी पण तो कंटाळा कुत्र्याने ओले अंग झटकावे तसा झटकला आणि कसाबसा का होईना ऑफिसला गेलो.

ही होती कालची गोष्ट.

आज सकाळी उठलो तर मुलगा म्हणाला, 'लीव्ह नोट द्या. शाळेत द्यावी लागेल.'
'

मी मग ती नोट त्याला दिली. संध्याकाळी त्याच्या शिक्षकांची चिठ्ठी आली. दुसऱ्या दिवशी हाफ सी. एल. टाकून मुलाच्या शाळेत जावेच लागले. हेडमास्तरांना भेटलो. ते म्हणाले, 'अहो हे काय लिहीले मुलाच्या सुट्टीचे कारण? काहीतरी पटेलसे तरी लिहायचेत की नाही?'

मी सत्यवचनाच्या अॅटॅक मध्ये लिहून टाकले, 'माझा पाल्य कुमार जगन काल दि. २५ जुलै रोजी कंटाळा आल्यामुळे शाळेत गैरहजर राहिला होता. '

हेडमास्तरांनी कीव आल्याच्या नजरेने पाहिले. सत्यवचनाच्या बदल्यात अर्धी सी. एल. देऊन घरी आलो.

हिला हकिकत सांगितली तर उलट ती माझ्यावरच चिडली. 'बावळट आहात' अशा स्पष्ट शब्दात फक्त सांगायचे राहिले. 'करा अजून सत्यवादीपणा आणि घालवा सी एल फुकट. माझ्या कामासाठी घ्यायला सांगितली सुट्टी तर सी. एल. कमी पडतात ना?' हिने आपला पॅरलल ट्रॅक पण चालू केला.

'अगं पण, आपल्याला पण येतो ना कधी मधी कंटाळा. तुला नाही तसा कंटाळा आला की आपण जातो कामत मध्ये. '

तिच्या कंटाळयाचा उल्लेख झाल्याने ती चिडली असावी, म्हणाली,

'आणि तुम्ही पण मारता दांड्या. पण कारण मात्र हे देत नाहीत. चांगली दशपुत्रे डॉक्टरांचे सर्टीफिकेटे घेऊनच जाता ना?'

हे मात्र खरे. दशपुत्रे आमचे सज्जन डॉक्टर. खोटे सर्टीफिकेट देत नाहीत आणि त्यांना खरी वाटतील ती बिना फी देतात. पण त्याबद्दल त्यांना आदल्या दिवशी दात नाहीतर डोके दुखल्याचे खोटेच सांगावे लागते एवढे खरे.

असो. एकूण सत्यवचनाची पुरेपूर किंमत चुकवावी लागली.

हे सर्व मी माझ्या मित्राला सांगितले. तर तो म्हणाला, 'तुला आपल्या देशाचे ब्रीदवाक्य ठाऊक आहे?'

मी एक सुजाण नागरिक आहे. मी म्हणालो, 'हे काय विचारतोस? सत्यमेव जयते. '

'सत्यमेव जयतेचा अर्थ कळतो तुला?'

'अर्थात कळतो. शेवटी सत्याचाच विजय होतो. '

'नाही. तू इथेच चुकतो आहेस. याचा अर्थ आहे सत्याचा विजय शेवटी होतो. सत्य असत्याची नेहमीच लढाई सुरू असते. त्यातील मधल्या लढाया असत्यच जिंकत असते. अगदी शेवटी हिंदी सिनेमात कसे पोलिस पोहोचतात तसे सत्य जिंकते. हा शेवट कधी हे मात्र सांगता येत नाही. आणि एक. एखादा रिक्षावाला मागे सुटलेली बॅग परत आणून देतो तर त्याचे कोण कौतुक होते. पेपरात फोटोबिटो येतात. जर उद्या सारेच तसे प्रामाणिक झाले तर कोणी ढुंकून ही पाहिल का त्याच्याकडे? तसेच हे सत्याचे आहे. सगळेच सत्यवचनी झाले तर कसले सत्याचे कौतुक. असत्याशी झुंज घेतल्यानेच त्याचे तेज झळाळते. म्हणजे बहुतेक लोक असत्य कथन करत असतात म्हणूनच हे सत्याचे कोडकौतुक. '

माझा मित्र नेहमी मुलभूत असा विचार करतो. आणि मुख्य म्हणजे तो फावड्याला फावडेच म्हणतो, कुदळ नाही! ( हा इंग्रजीतील call spade a spade वाक्प्रचार मातृभाषेत आणायचे श्रेय माझेच, हे मात्र मी सत्यच सांगतोय, असत्य नाही )

७

**राज-माज शास्त्राची प्रश्न पत्रिका**

*शिक्षण क्षेत्रात आमूलाग्र बदलाचे वारे वाहात आहेत अशी बातमी आहे. कालची शिक्षणव्यवस्था आज कालबाह्य झाली आहे. मुलांच्या सांगोपांग ( हे आता कुठलं नवं आंग सांगा पाहू, मुलांनो ? ) विकासाकरता नवीन विकासाधारित शिक्षण पद्धती बनवली जात आहे. बाकी विषयांबरोबरच त्यात राज्यशास्त्र नि समाज शास्त्राचा मिलाफ घडवणारे राज-माज शास्त्र या विषयाचा समावेश होणार आहे. यात प्रश्नाधारित शिक्षण असेल. बाकी विषयांसारखे धडे न देता फक्त प्रश्न विचारून त्यांची उत्तरे शोधण्याची सवय मुलांना लावण्यात यावी या हेतूने हा विषय समाविष्ट होत आहे. यात समकालीन राजकारण आणि समाजकारण यावर आधारित प्रश्न असतील. नेत्यांना भेटून त्यांच्याकडून प्रत्यक्ष अनुभव मिळवण्यावर भर असेल.*

ही आहे नमुन्यादाखल राजमाज शास्त्राची प्रश्नपत्रिका

१. आश्वासने म्हणजे काय? ती का दिली जातात? ती पुरी केली असता नरकात जावे लागेल असे नेत्यांना का वाटत असावे?

निवडणूक जाहीरनाम्यातील आश्वासने आणि इतर सभांतील आश्वासने यांतील फरक कोणते?

तुमच्या विभागातील आमदार खासदारांनी दिलेल्या आश्वासनांची यादी करा. यात तुम्ही तुमच्या कल्पनाशक्तीने भर घालू शकाल अशी दहा नवीन आश्वासने लिहा.

( शिक्षकांसाठी सूचना : भावी पुढारी बनवण्यासाठी हा अभ्यास नीट करवून घ्या)

२. आपण पंतप्रधान किंवा मुख्यमंत्री झालोच आहोत असे समजून भाषण तयार करा. अशा थाटात बोलणाऱ्या आजूबाजूच्या दहा नेत्यांची नावे गोळा करा.

३. आपण नामानिराळे राहून भ्रष्टाचार करण्याच्या विविध पद्धतींचा अभ्यास करा. यातील धोके आणि फायदे यांचा जमाखर्च मांडा.

४. स्वातंत्र्यानंतरही कित्येक नेते त्या काळची आठवण म्हणून तुरुंगात जात असतात. अशा नेत्यांची यादी बनवा. त्यांच्या तुरुंगात जाण्याच्या कारणांची मीमांसा करा. लोकमान्य टिळकांनी कारागृहात ग्रंथ लिहिले. आजचे नेते तुरुंगात काय काय करत असतील याचे पाच अंदाज बांधा. उद्या तुरुंगाच्या भिंती बोलू लागल्यातर काय सांगतील याचा कल्पनाविस्तार करा.

५. निवडणूक आचारसंहिता ही काय गोष्ट आहे? 'मतदानाआधी मतदारांस निवडणूक आचारसंहिता भंग न करता कसे भुलवावे' याच्या दहा युक्त्या आपल्या नगरसेवकाकडून गोळा करा.

६. आभासी विकास म्हणजे काय? इमेज बिल्डिंग म्हणजे काय? आपण आपल्या मतदारसंघात न केलेल्या विकासाची जाहिरात कशी करता येईल याचा आराखडा तयार करा.

७. 'तो मी नव्हेच' किंवा 'मला असे म्हणायचे नव्हतेच' अशा आशयाची वक्तव्ये तयार करा. आधी बोलून नंतर 'मला तसे म्हणायचे नव्हते' असे म्हणण्यासारखी दहा विधाने वहीत लिहा.

८. मोठ्या नेत्यांच्या पावलावर पाऊल टाकणाऱ्या छोट्या बालकांची यादी तयार करा. त्यांच्या चिमखड्या बोलांचा संग्रह बनवा. ही बाळे खुर्चीत कधी चिकटतील याचा अंदाज व्यक्त करा. घराणेशाहीला विरोध करणाऱ्या नेत्यांची यादी बनवा. आपल्या मुला-नातवंडांना आपला वारसदार नेमताना त्यांनी कोणती कारणे द्यावीत याचा कल्पनाविस्तार करा.

९. दोन विरोधी नेत्यांची समोरासमोर भेट घडवून त्यांचे भांडण लावून द्या. त्या गंमतीबद्दल दुसऱ्या दिवशी वर्गात चर्चा करा.

१०. जातीय दंगली म्हणजे काय? आपल्या विभागातील दंगली घडवण्याचा अनुभव असणाऱ्या नगरसेवक किंवा आमदाराची मुलाखत घ्या.

'दंगली, दुष्काळ आणि त्यांचे राजकीय फायदे' या विषयावर आपल्या विभागातील खासदारांची मुलाखत घ्या.

११. 'घटनादत्त अधिकार' आणि 'विशेषाधिकार' म्हणजे काय? शिवाजीमहाराजांना अडवणारा बालवीर आणि टोलनाक्यावर आमदारास अडवणारा कारकून यांची तुलना करा. शिवाजीमहाराज आणि आजचे आमदार यांची तुलना करू नका. तुम्ही जर त्या ठिकाणी कारकून असतात तर काय केले असते ते पाच वाक्यांत लिहा.

१२. 'चामडी सोलू', 'फरफटत आणू', 'समुद्रात बुडवू' अशासारख्या बाणेदार घोषणा गोळा करून त्यांचा संग्रह करा. या बाणेदार वक्तव्यांच्या जनकांची चित्रे वहीत चिटकवा. या वक्तव्यांबद्दल नंतर काय कार्यवाही करण्यात आली याची माहिती घ्या.

१३. तुमच्या घरापासून शाळेपर्यंत किती खड्डे लागतात याची मोजदाद करा. त्यातील तुम्हाला आवडलेल्या खड्ड्याचे वर्णन करा. तो तुम्हास का आवडतो याची कारणे लिहा.

१४. कातडी कमावणे म्हणजे काय? गेंड्याची कातडी कशी कमवतात? हे आपल्या विभागातील नेत्यांकडून जाणून घ्या.

१५. 'काका मला वाचवा' अशी घोषणा आधी दिली जात असे. काकाच 'मला वाचवा' असे कधीपासून ओरडू लागले? तुमच्या माहितीतील सर्व काका पुतण्यांची यादी तयार करा.

१६. हे करून पहा

अ ) एक काल्पनिक मतदान बूथ बनवून तो ताब्यात घेऊन दाखवा. यासाठी जरूरी असलेल्या सामानाची यादी बनवा.

ब) घरच्याघरी एक अणुभट्टी बनवा. गरज पडल्यास आपल्या पालकांची मदत घ्या. एक बॉंब बनवून तो फोडण्याचे प्रात्यक्षिक करा. आपले अनुभव प्रयोगवहीत लिहा

क) पाक व्याप्त काश्मीर मध्ये जाऊन तिथे राहणाऱ्या दहा लोकांची मुलाखत घ्या.

१७. निबंधलेखन

क) मी पंतप्रधानपदाचा उमेदवार झालो तर?

ख) निवडणूक जाहीरनामा : किती सत्य, किती कल्पनाविलास?

ग) निवडणुका नसत्या तर

घ) आश्वासनांच्या नाना तऱ्हा

च) होय! मी भ्रष्टाचार केलाय!

## ८

## माझिया होर्डिंगचे गायन

आज खूप दिवसांनी ते जुने दिवस आठवले. आम्ही तेव्हा नवीनच होतो. शाळा सोडली नि समाजकारणात पडलो. अभ्यासापेक्षा आम्हाला लोकांत मिसळायाची आवड. तेव्हा कोणालाही मदत लागली की आम्ही धावून जात असू. आमच्या बऱ्यापैकी ओळखी होत्या. काही मोठे लोक आम्हास ओळखत असत. पण आमची खरी इच्छा होती की लोकांनी आम्हाला ओळखावे. त्यासाठी काहीतरी असे करावे की लोक ओळखू नि घाबरूसुद्धा लागतील.

आम्ही कार्यकर्ते होतो. गणेशोत्सवात भाग घ्यायचो. रिसिटबुके घेऊन वर्गणी गोळा करायला दारोदार फिरायचो. गोकुळाष्टमीला दहिहंडी, वर्षाकाठी सत्यनारायणाची पूजा, सार्वजनिक शिवजयंती वगैरे मध्ये आमचा सहभाग असायचाच. मग रक्तदान शिबिरे आयोजित केली, बंदमध्ये दंडुके घेऊन आम्ही दुकाने बंद पाडत असू. दोन चार रिक्शावाल्यांच्या पाठीत काठ्या हाणीत असू आणि बसेस वर चार दोन दगड फेकत असू. पण हे सर्व सर्वसामान्य कार्यकर्ते करतातच. आम्हाला त्याच्याही वर उठायचे होते. त्यासाठी जीव तळमळत होता. या वेगाने आम्ही रिटायर होताना आम्हाला कदाचित हरणाऱ्या सीट वरचे नगरसेवकपदाच्या इलेक्शनचे तिकीट मिळाले असते किंवा निष्ठावान कार्यकर्ते म्हणून फारतर नेत्यांनी आम्हाला ओळखले असते आणि आम्ही पण यावर समाधान मानून गप राहिलो असतो. पण आम्हाला स्वत:च नेता व्हायचे होते.

आम्ही मग खूप विचार केला. एखाद्याची राजकीय ताकद कशात असते? कायदेशीर कामे तर सर्वच करतात. त्यासाठी काही फार अक्कल लागत नाही. जनहिताचा आव सगळेच आणतात. तो तसा आणावाच लागतो. आम्हीही ते करायचो. पण खरी ताकद

असते ती बेकायदेशीर कामे करून ती निभाऊन नेण्यात. स्वत: ती करून नामानिराळे राहाण्यात नि ज्यांनी ती प्रत्यक्ष केली त्यांची मानगूट सोडवून आणण्यात. असे केले तरच आपली वट तयार होते.

अर्थात हे कळायला निमित्त झाले ते एका होर्डिंगचे. आमच्या एरियात आम्ही रातोरात आमच्याच वाढदिवसाच्या शुभेच्छांचे एक होर्डिंग उभारले. होर्डिंगची जागा ऎन मोक्याची होती. आमचा मोठा फोटो मध्ये नि मागे नगराध्यक्ष नि राज्याध्यक्ष नि अजून मागे झाडून सारे पक्षश्रेष्ठी. सकाळी आमच्या एरियात ही खळबळ माजली. होर्डिंग बेकायदेशीरच होते. पण मागे मोठमोठ्या पुढाऱ्यांचे फोटो पाहून कोणाची हिंमत होणार हात लावायची. पालिकेची परवानगी नि पैसे भरणे अशा क्षुल्लक गोष्टींत आम्ही पडलो नव्हतो. आले मनात नि लावला बोर्ड. खरे तर आमचा वाढदिवस चांगला दोन महिने नंतर होता पण एकतर डोक्यात आयडिया आली आणि नेमकी ती होर्डिंगची जागा रिकामी सापडली. लावून टाकले होर्डिंग नि काय. हाच बोर्ड कायद्याने उभारायला किती परवानग्या नि पैसे लागले असते कुणास ठाऊक आणि ते करे पर्यंत आमची साठी उलटली असती कदाचित. दुसऱ्या दिवशी पासून सगळे दुकानदार आम्हाला संतोषभाई नावाने हाक मारू लागले.

आपल्या आयुष्यात एखादी घटना घडायची असेल तर सगळे काही त्याच दिशेने घडायला लागते. याचा प्रत्याय आम्हाला दुसऱ्याच दिवशी आला. म्हणजे योगायोगाने म्हणा नि सुदैवाने म्हणा दुसऱ्याच दिवशी अजून एक घटना घडली. आम्ही बाहेर कसेही असलो तरी घरी आईला मदत करत असू. नेमके त्याच दिवशी आईने धार काढायला म्हणून दोन चाकू नि एक मटणाचा चॉपर हाती दिला. आम्ही निघालो धारवाल्याकडे बाजारात. इकडे नाक्यावर काहीतरी राडा झाला. भांडण जोरात सुरू होते. आमच्या हातातील चाकू नि चॉपर पाहून दोघे भांडणारे घाबरले नि पळून गेले. हा आमच्या आयुष्यातील टर्निंग

पॉइंट. आईचा आशीर्वाद आणि काय म्हणणार याला? या प्रसंगानंतर आम्ही फेमस झालो. लागोपाठच्या दोन दिवसांत लोकांची आमच्याकडे पाहायची नजर बदलली. पुढे आम्ही त्यावर कळस चढवला. आज आम्ही शिक्षण मंत्री आहोत. शाळा सोडलेला एक माझ्यासारखा माणूस आज शिक्षणमंत्री आहे हेच आपल्या लोकशाहीचे आपल्याला देणे आहे.

जाता जाता आम्हाला त्या चाकू सुरी प्रसंगाची गंमत वाटते ती सांगतो. आज आम्ही आहोत त्याहून मोठे होऊ. उद्या आमच्या वर पाठ्यपुस्तकातून हा धडा येईल. आमच्या शिक्षण खात्यातील लोक मग त्यावर प्रश्न तयार करतील. म्हणजे उदाहरणच द्यायचे तर

प्र. : या प्रसंगातून आपल्याला नायकाचे कोणते गुण दिसतात?

उ. : नायकाची मातृभक्ती आणि आईचा आपल्या मुलाला असणारा आशीर्वाद या प्रसंगातून आपणास दिसतो.

प्र. : या प्रसंगातून काय बोध घ्याल?

उ. : दैवाची साथ असेल तर साधा माणूस ही मोठा होऊ शकतो.

ही आपली अशीच गंमत. पण कधी असे होणारच नाही आणि आम्ही पाठ्यपुस्तकातून मुलांचे आदर्श म्हणून येणारच नाही असे नाही मात्र. नशिबावर अवलंबून आहे सगळे. असो. तर एका बेकायदेशीर होर्डिंगने आम्ही फेमस झालो. कायदा हा इतरेजनांसाठी आणि बेकायदा हा आमच्यासारख्या नेत्या आणि धुरिणांसाठी. ही बेकायदेशीर कामेच आमच्या नेतृत्वासाठी महत्त्वाची. त्यातच आमचे खरे गुण दिसतात नि खरी ताकद दिसते.

आमचे पहिले होर्डिंग आम्ही स्वखर्चाने उभारले. बोर्डवाल्याला पैसे अॅडवान्स देऊन. तो चढवून बांधणाऱ्याला ही पैसे दिल्याचे आठवते. नंतर आम्ही एवढे मोठे झालो की बॅनरवाल्या इस्माईलला आमच्याकडे पैसे मागायची हिंमत नाही होत. ते चढवणाऱ्यांची

मात्र आम्हाला दया येते. पाच पन्नास रूपयांसाठी किती ही मेहनत? घामाने निथळून बिचारे काम करतात. आजच्या महागाईच्या जमान्यात त्या पन्नास रूपयांनी काय त्यांचे पोट भरणार. उगाच त्यांना खिजवल्यासारखे वाटावयास नको म्हणून आम्ही ते पण पैसे द्यायचे टाळतो. त्यांच्या मनाची काळजी आम्ही नाहीतर कोण घेणार? होर्डिंग काढायची जबाबदारी मात्र महापालिका घेते. ती ही फुकटात. म्हणून आमचे दसरा दिवाळी, इद, ख्रिसमस, नवीन वर्ष आणि आमच्या लाडक्या पक्षश्रेष्ठींच्या वाढदिवसाचे होर्डिंग्स लागतच राहातात.

ग्रामीण नेतृत्व गावच्या मातीतून येते म्हणतात. आमचे शहरी नेतृत्व होर्डिंगतून आलेले आहे. गावचे कवी 'माझिया मातीचे गायन' करतात तसे आज आम्ही 'माझिया होर्डिंगचे गायन' करतो आहोत. आमचे एक स्नेही आहेत. आहेत आमच्या विरोधी पक्षात पण राजकारणात असूनही त्यांची प्रतिमा विद्वान अशी आहे. प्रामाणिकपणे ते कामाला जुंपून घेतात. लहानपणापासूनची आमची ओळख. स्वभावाने तसे गमत्या आहेत. एकदा आम्हाला म्हणाले, 'हमारे पास लोगोंकी इज्जत है, इतनी सारी लिखी हुई किताबें हैं, तुम्हारे पास क्या है?' आम्ही पण मागे हटलो नाही, म्हणालो, 'मेरे पास ये एक होर्डिंग और उससे आई हुई व्होट बॅंक है! ' आम्ही गंमतीने म्हणालो असलो तरी हे खरे तर खरोखरच खरे आहे.

हे सर्व आठवायला कारण म्हणजे कोर्टाच्या आदेशाने सरकार रस्तोरस्तीचे होर्डिंग्स काढून टाकणार आहे म्हणे. आमचे तर झाले पण होर्डिंग्स नाहीत तर नवीन शहरी नेतृत्व कुठून पुढे येणार? आम्हाला याचीच चिंता वाटते. किंवा असेही असेल. कदाचित याही वर उठून अजूनही ताकदीने होर्डिंग्स चढवणारा अधिकच ताकदवान नेता म्हणून पुढे येईल. एखाद्या आपत्तीतूनही काही चांगले निघू शकते असे म्हणतात तसे.

९

## सार्वजनिक स्वच्छतामंत्र्यांच्या डायरीतील एक पान

आजची सकाळ पण काल सारखीच सुरू झाली. सकाळी सहा वाजता उठून वॉर्डातल्या आदर्श शौचालयाचे उद्घाटन. डोळे चोळीत उठावेच लागले. शौचालयाचे उद्घाटन करायचे म्हणून डायरेक्ट पोहोचलो. कार्यकर्ते आणि काही लोकं सकाळ सकाळी बरेच जमले होते. पाणी आहे की नाही याची खात्री करून घेतली प्रथम नंतर प्रात:र्विधी आटोपले नि साखळी ओढली. साखळी ओढून पाणी वाहायचा आवाज आला तसा सर्वांनी टाळयांचा कडकडाट केला. मग मनुज नगरातील आदर्श शौचालयाचे उद्घाटन झाल्याचे मी जाहीर केले. गेल्या आठ दिवसातील हे आठवे शौचालय उद्घाटन. त्यामुळे आम्ही सकाळी घरी नसतोच आजकाल. पहिल्या दोन दिवसांच्या उद्घाटनाला तर टाकीत काय नळाला पण पाणी नव्हते. अशी पंचाईत झाली म्हणून सांगू. नशीबाने आमच्या पीएंनी धावपळ करून कुठून तरी दोन बादल्या पाणी मागवले. तेव्हापासून कानाला खडा. पहिले नळाला पाणी आहे की नाही ते चेक करायचे. आता पालिकेच्या निवडणूकाच जवळ आल्या तर या उद्घांटनांचा धूमधडाका आम्ही लावला. मागे पंतप्रधानांनी कसलेतरी उद्घाटन आपल्या ऑफिसात बटन दाबून केले होते तसं काहीतरी नाविन्यपूर्ण म्हणून म्हटले रिबिन न कापता स्वत:च वापर करून शौचालयाचे उद्घाटन करावे. स्वत: मंत्रीमहोदय येणार असूनही पाण्याची टाकी रिकामी ठेवणाऱ्याला म्हटले गडचिरोलीलाच पाठवावे. निवडणूका होऊन जाऊ दे मग बघावे त्यांच्याकडे. त्यानंतर मग भाषण. गाडगे बाबा आणि स्वच्छता यावर गेले सात दिवस बोलून मी कंटाळलो. मग आज स्वच्छतेचा विषय थेट अमेरिका आणि चीनशी भिडवला. असे आंतरराष्ट्रीय संदर्भ घातले की आपली एक मोठी प्रतिमा तयार होते म्हणे. आमचे कार्यकर्ते तसे हुशारच. बरोबर हवे तेथे टाळ्या वाजवतात. साबण लावून हात धुतला. अल्पोपहार घेतला. घरी आलो तोवर नऊ वाजले होते.

मुख्यमंत्र्यांनी पण यावेळी काय खूळ काढले आणि सार्वजनिक स्वच्छता मंत्रालय नावाचे नवे खाते चालू केले आणि मलाच देऊ केले. हे काय मंत्रालय झाले? म्हटले शिक्षण नाही तर आरोग्य खाते तरी? तर मुख्यमंत्री म्हणाले, 'शिक्षण मंत्री कसा अशिक्षित किंवा कमी शिक्षित तरी हवा. तुमच्यासारखा ग्रॅज्युएट काय कामाचा? आणि आपले नानासाहेब आताच हॉस्पिटलातून डिस्चार्ज झालेत, त्यांना आरोग्याचे प्रश्न नीट कळतील. ' मी म्हटलं

नुसत्या आमदारकीपेक्षा कुठलं का होईना मंत्रीपद बरं. पण सार्वजनिक स्वच्छता म्हणजे? असा माझ्या चेहऱ्यावरचा भाव पाहून मुख्यमंत्री म्हणाले, 'घाबरू नका, तुम्हाला फक्त साफसफाई, शौचालये वगैरे बघायचे. ' मी मनाशी म्हटले कमीत कमी शौचालये बांधकाम वगैरे मधे कार्यकर्ते सांभाळता येतील. परत ५ वर्षानी निवडणूक लढवायची म्हणजे आर्थिक तयारी हवीच. असो. आता येणारी पालिकेची निवडणूक म्हणजे टेन्शन. विरोधकांकडून वॉर्ड खेचून आणायचा म्हणजे मेहनत हवीच. त्यासाठी इतका सगळा खटाटोप.

दुपारी दोन वाजता Bombay Beautiful ची माणसं आली. Bombay Beautiful नावाची एन. जी. ओ आहे म्हणे. त्यांना बोलायचे होते होर्डिंग आणि बॅनर्स बद्दल. जसे ते आले तसे मी एकदम आक्रमक पवित्रा घेत म्हटले, 'You seem to be not proud of Maharashtra. Bombay चे मुंबई होऊन कित्येक वर्षं झाली पण तुम्हाला वेळ झाला नाही नाव बदलायला?' माझ्या या पवित्र्याने ते अर्धे गारद झाले. होर्डिंग्स बद्दल काही म्हणणार त्याच्या आधीच मी पुढचा बाउन्सर टाकला. 'समजा सगळी होर्डिंग्स काढली तर ग्यारंटी घ्याल का मुंबई सुंदर व्हायची? You are not aware of government policy. होर्डिंग्स मागे पडक्या, रंग उडालेल्या बिल्डिंगी, कचऱ्याचे ढीग लपतात आणि मुंबई उलटी अधिक सुंदर होते. फक्त ते आम्ही officially सांगत नाही. नाहीतर होर्डिंग वाले सरकारकडून भाडे मागायचे. म्हणून silently होर्डिंग्स ना उत्तेजन द्यायचे सरकारी धोरण आहे. आणि तुम्हाला फक्त मुंबई सुंदर करायची आहे तर आम्हाला महाराष्ट्र आणि जमलं तर हा देश सुंदर करायचाय. ' माझ्या म्हणण्यापुढे ते सर्व हतबल झाले. माझ्यापुढे बोलून काही फायदा नाही असे समजून त्यांनी काढता पाय घेतला. आता कार्यकर्त्यांना प्रसिद्धी द्यायची तर दुसरा काही मार्ग आहे का? शेवटी ते सुद्धा त्यांचे फ्रीडम ऑफ एक्स्प्रेशनच नाही का? या बाबतीत मी माझ्या गुरूंचा मार्ग अवलंबला. असे कोणी काही प्रश्न घेऊन आले तर सर्व प्रथम त्यांचा कुठला तरी वीक पॉईंट पकडा, नंतर ते काही बोलायच्या आतच त्यांचा मुद्दा असा काही खोडा की त्यांनी तुमच्या कडे कुठल्याही आशेने बोलणेच सोडून द्यावे. येथे पण तेच झाले. अहो होर्डिंग्ज आणि बॅनर काढून टाकल्यास आमची नावे लोकांच्या लक्षात तरी राहतील काय? Bombay Beautiful वाल्यांचे काय जाते बोलायला.

ही लोकं गेली आणि कुठल्यातरी चॅनेलचे लोक घुसले कॅमेरे आणि माईक ची बोंडके घेऊन. त्यांना मिठी संदर्भात काही बाईट्स हवे होते. मिठी हा आमचा आवडता विषय. नशीब तरी लगेच लक्षात आले की मिठी नदी बद्दल बोलतायत हे. नाहीतर भलतीच ब्रेकिंग न्यूज झाली असती. माईक समोर आला आणि आम्हाला वेगळेच स्फुरण चढले. जणु मी त्यांच्या पुढे एक vision document च ठेवले. आम्ही सांगितले, 'आज पर्यंत एक लाख पाच मेट्रीक टन गाळ काढून झाला आहे, अजून ५ लाख मे. ट. काढला जाईल. त्यानंतर पाणी शुद्ध करायचा उपाय म्हणून मुंबईत १५% पाणीकपात करून पिण्याचे पाणी रोज मिठी नदीत सोडण्याची योजना आहे. नंतर बोटिंग ची व्यवस्था करण्यात येणार असून दोन्ही किनाऱ्यावरील झोपड्यांना heritage status देऊन हेरिटेज टूर्स सुरू केल्या जातील. बोटिंगच्या कॉंट्रॅक्ट साठी बोलणी चालू आहेत. यासंदर्भात आमचे एक शिष्टमंडळ लवकरच पेरू आणि चिली देशांच्या दौऱ्यावर जात आहे. ' चॅनेलवाले खूष. त्यांनी बाईट्स चे घास मागितले आणि इथे तर पूर्ण जेवणाची थाळीच त्यांना मिळाली. आम्ही बोलता बोलताच मिठी नदीत बोटिंग, मिठीच्या किनाऱ्यावरील झोपड्यांना हेरिटेज दर्जा अशा ब्रेकिंग न्यूज सुरू झाल्या आणि टिव्ही वर आम्ही. एका चॅनेलनी तर मिठी नदीत बोटिंग करतानाचे ग्राफीक डिझाईनच सुरू केले.

पाच वाजता आमचे जुने कार्यकर्ते वासुदेव शिंगरेंचे भाऊ दामूच्या केशकर्तनालयाचे उद्घाटन. नशीब इथे उद्घाटनाला कात्री केसांवर नाही तर रिबिनीवरच चालवायची होती. नेहमीप्रमाणे भाषणाला उभे राहिलो. मराठी तरूणाने उद्योजक व्हायला हवे पासून सुरू केलं. पुढे भाषणात आजच्या अर्थव्यवस्थेवर बोललो. त्यानंतर चीन, जपान आणि कोरिया बद्दल काहीबाही बोललो. आमचे कार्यकर्ते अगदी निष्टावान. हवे तिथे नेमक्या टाळ्या पडतात. शेवटी म्हटले की शिंगरे सारख्या तरूणांच्या हातीच आज महाराष्ट्राची नाडी आहे तेव्हा शिंगरे आमच्याबाजूला हातात व्ही आकारात कात्री घेऊन उभा होता! भाषणाची पण एक पद्धत असते. बोलण्यात दिवसात एकदा तरी आर्थिक विषय आणायचाच. कुठेना कुठे आंतरराष्ट्रीय संदर्भ जोडायचे. त्यातून आपली एक अभ्यासू नेता म्हणून इमेज तयार होते. बॉडी बिल्डिंग सारखे हे इमेज बिल्डींग. पुढे पुढे तर आपल्याला

याविषयातील खरेच सर्व येते असा स्वत:चाच भ्रम तयार होतो. असो आतापर्यंतचा दिवस तर मस्त गेला.

आज संध्याकाळचे काय सांगायचे. महाराष्ट्राच्या नकाशावर तमाशा अशा कार्यक्रमात आम्ही प्रमुख पाहुणे. खरंतर सांस्कृतिक मंत्र्यांचे हे काम. पण त्यांना मुख्यमंत्र्यांनी खाते वाटपात गृहमंत्री न बनवता डायरेक्ट सांस्कृतिक मंत्रीच बनवून टाकल्याने ते नाराज. अधून मधून दिल्लीत मुख्यमंत्र्यांविरोधात आघाडी उभारायला जात असतात. तसे ते आज पण गेल्याने आमचा चान्स. लोककला विशेषत: तमाशा आमच्या जिव्हाळयाचा विषय. त्यामुळे आम्ही खूष. तिथे पण भाषणात लोककलांवर बोललो. लवकर जायचे असे आयोजकांना सांगताच त्यांचा आग्रहच पडला थांबण्यासाठी. शेवटी उशीर झालाच रात्री.

घरी आलो तर रात्रीचे २ वाजले होते. गृहमंत्री रागावल्या होत्या. एरवी कुठल्या सांस्कृतिक कार्यक्रमात आम्ही त्यांना घेऊन जातो पण आज ते शक्य नव्हते. इथे आम्ही आमच्या गुरूंचीच पद्धत अवलंबतो. ते म्हणजे शरणागती. घरी आम्ही कायमच ‘सॉरी’ मोड वर असतो त्यामुळे गृहस्वास्थ्य चांगले राहते. आमच्या एका सॉरी नंतर सौ. म्हणाल्या, 'झोपा लवकर आता. उद्या परत लवकर उठायचय. ' मी म्हणालो, 'हो तर मिलन नगरात उद्घाटनाला जायचे आहे. निवडणूक जवळ आहे. मेहनत तर करावीच लागेल ना?'

१०

## काही नवीन पॉलिटिकल आयडियाबाजी

पूर्वीचा जमाना ismचा होता. समाजवाद, भांडवलशाही किंवा साम्यवाद, मार्क्सवाद वगैरे वेगवेगळे वाद होते. प्रत्येकाचे आपले आपले तत्वज्ञान होते. पुढारी लोकांचा त्यावर बराच किंवा थोडाफार तरी विश्वास असे. त्यांचा असल्यामुळे त्यांच्या अनुयायांचा पण असे. आज आपल्याकडील राजकारणाची एक ब्रॉड विभागणी केली तर त्यात काही डावे तर काही उजवे आहेत. काही मधले आहेत. त्यातल्यात्यात डावे राजकारणातील वाममार्गाला जास्त लागले नसले तरी समाजोन्नती ( हा शब्द मी जुन्या पुराण्या अग्रलेखांतून उचलला आहे. आज याचे काही फारसे काम लागत नसावे )च्या दृष्टीने पाहिले तर डावे, उजवे आणि मधले यांत फार काही डावे उजवे करावे असे नाही. आयडियॉलॉजीचा जमाना मागे पडला. नवनवीन आयडियांचा जन्म झाला. आयडियालॉजीपेक्षा आयडिया बाजी सत्तासोपान चढण्याकरता जास्त उपयोगी ठरू लागली. या आयडियाबाजीचे हे काही नमुने :

<u>संधी साधू :</u>

'Opportunity knocks only once. ' यावर यांची श्रद्धा असते. संधी ही साधण्याचीच गोष्ट आहे यावर यांचा विश्वास असतो, मग ती आपल्या पक्षातून असो की दुसऱ्या कुठल्या. पक्ष वगैरेची बंधने यांना मानवत नाहीत आणि आलेली संधी यांना हातून सोडवत नाही. मिळालेल्या किंवा मिळवलेल्या संधींचे सोने करण्याची संधी हे हातून घालवत नाहीत. संधी मिळणे आणि मिळवणे हे यांचे जीवनध्येय असते.

<u>आयाराम आणि गयाराम</u>

प्रभू रामचंद्र आमचा आदर्श आहे. या देशात रामभक्त खूप आहेत. पण या आयाराम गयारामांसारखे कोणी नसतील. ही रामभक्तांची नवी जमात आहे आणि

संधीसाधूंची पोटजमात. जेथे कृष्ण तेथे जय असेल तर रामाने पण मागे का राहावे? फक्त येथे सत्ता हाच राम असतो एवढेच.

तळे राखील तो पाणी चाखील

आपल्या संस्कृतीत पाण्याला महत्त्व आहे. कोणी कोणाला पाण्यास नाही म्हणत नाहीत. तेव्हा नुसते पाणी पिण्यासाठी तरी कशाला हवी कोणाची परवानगी? तीही ते तळे राखणाऱ्यालाच? पाणी चांगले आहे की नाही हे राखणदारास मध्ये मध्ये पहावेच लागते. हे त्याचे कर्तव्यच आहे समजले तरी चालेल. आता ते पाणी चाखायला मिळावे म्हणून ही काही लोक राखणदारी करायला तयार होत आहेत ही गोष्ट नैसर्गिकच म्हणावी लागेल.

तिसरे

हे लहानपणी सारे काही गोष्टी रूपात शिकले असतात. त्यामुळे ऐकलेल्या बोधकथांतून योग्य तो तात्पर्य काढण्याची सवय यांना असते. दोन बोक्यांनी पळवलेल्या लोण्याचा गोळा माकड फस्त करतो हेच यांचे राजकीय जीवनविषयक तत्त्वज्ञान असते. या गोष्टीतून आपल्यासारखे बहुसंख्य 'दोघांचे भांडण आणि तिसऱ्याचा लाभ' असे तात्पर्य काढत असले तरी यांचा निष्कर्ष वेगळा असतो आणि तेच यांच्या अस्तित्वाचे आणि प्रगतीचे रहस्य असते. दोघांकडील लोण्याचा गोळा हवा असेल तर आपण 'तिसरा' होणे गरजेचे आहे हे यांनाच उमगते. त्यामुळे लोण्याचा गोळा असणाऱ्या बोक्यांच्या हे शोधात असतात. मग त्या दोघांत भांडणाची व्यवस्था लावून दिली की हे लोणी खायला मोकळे होतात. यात भांडणारे दोघे कोणीही असोत, तिसरे मात्र स्वत: असू याची हे काळजी घेतात. मग यासाठी समाजात ते आणि आपण अशी व्यवस्था लावणे, कधी हे 'ते' होतील तर कधी 'आपण' होतील. मग रीतसर भांडण सुरू झाले की आपला कार्यभाग साधून मोकळे होतील. 'तिसरे' बनणे हीच यांची पॉलिटिकल आयडियाबाजी.

गोबेल्सपंथीय

’मना सज्जना गोबेल्स पंथेची जावे’ हा यांचा मंत्र असतो. त्यामुळे कोठेही काहीही ठोकून देणे आणि बिनधास्त राहाणे हाच यांच्या यशाचा पाया असतो. इतिहास हा यांच्या खास आवडीचा विषय. तो न घडवता तो बदलण्याचे सामर्थ्य यांच्या जिभेत असते. ’पब्लिक मेमरी इज व्हेरी शॉर्ट’ यावर यांची भिस्त असते. लोक एखाद दोन वर्षांपूर्वीची गोष्ट विसरतात तर काही शे वर्षांपूर्वी काय झाले याचे त्यांना काय आठवणार? मग हे आपले हत्यार म्हणजे जीभ उचलतात, धनुष्याला बाण लावावा तशी आपल्या टाळूला लावतात आणि शरसंधान करतात. आपण बोलतो ते खरे की खोटे अशा मामुली बाबींकडे हे लक्ष देत बसत नाहीत. खरे किंवा खोटे काहीही बोला, दोघांची सरमिसळ करून बोला पण असे बोला की समोरच्यास विचार करावयास वेळ मिळू नये. हीच यांची विकसित झालेली किंवा केलेली स्टाईल असते. या बळावर ते विरोधकांना नेस्तनाबूत करतात.

नाहीतर. . . .

मी म्हणेन ती पूर्व दिशा हा यांचा खाक्या असतो. ’दोन दिवसात हे करा’ किंवा ’दोन आठवड्यात ते करा’ असे आदेश हे देतात, याच्या पुढे ’नाहीतर. . . ’ हा इशारारूपी बॉंब तयार ठेवतात. ’नाहीतर. . . ’ हा यांचा आवडता शब्द. दरवेळी हे एकाच मागणी साठी हे शस्त्र वापरतील असेल नाही. आज ज्या गोष्टी साठी इशारा देतील उद्या त्याच्याच विरुद्धही तसाच इशारा देतील. ’नाहीतर. . . ’ म्हटल्यावर यांच्या अनुयायांना चेव चढतो. त्यांच्या हाताला काम पुरवणे आणि आपले महत्त्व वाढवून घेणे असे दोन्ही हे यातून साध्य करतात. न चालवलेल्या गाडीची बॅटरी डाऊन होते तसे अनुयायी हाताला काम नसले तर गंज खातात यासाठी या ’नाहीतर. . . ’ नंतर केलेल्या तोडफोडीचा यांना खूप फायदा होतो. त्यामुळे हेच यांचे राजकीय तत्त्वज्ञान असावे असे वाटायला लागते.

हे असे काही आयडियाबाजीचे नमुने. आपल्या सुपीक डोक्यातून नवनवीन आयडियांचे पीक निघतच असते. तोंडात बोटे घालून बघत राहणे एवढेच आपण करायचे. हे असले काही जमले असते तर आपण थोडीच आम आदमी राहिलो असतो?

११

## बजबजपुरीत सौजन्य सप्ताह

बजबजपुरीत त्या दिवशी एकच खळबळ उडाली. बजबजपुरी हा एक खंडप्राय देश. त्या देशात आणीबाणी जाहीर व्हावी अशी खळबळ उडाली. कारण फक्त सौजन्य सप्ताह जाहीर होण्याचे झाले. सौजन्य दाखवायला लोकांची ना नव्हती पण सदा तेच दाखवायचे म्हणजे आपल्या अभिव्यक्तीस्वातंत्र्यावर हा घाला आहे असे लोकांना वाटले तर त्यात आश्चर्य वाटावे असे काही नाही. नंतर हे सौजन्य फक्त आठवड्यापुरताच पाळण्याचे आहे हे ऐकून लोकांनी सुटकेचा नि:श्वास टाकला नि जास्त विरोध न करण्याचे सौजन्य दाखवले.

बजबजपुरी एक लोकशाही कम राजेशाही कम हुकुमशाही होती. म्हणजे दर पाच वर्षांनी लोक आपला आपला नेता निवडीत. निवडणुका होत. निवडलेला मग राजासारखे राज्य करीत असे आणि आपला आपला हुकूम चालवीत असे. पाच वर्षांसाठी त्याला मग इकडेतिकडे बघण्याची गरज नसे. लोकही मग त्याला तसे सहन करीत. मग सतत त्याला विरोध करीत राहात. कधी कधी तर त्या राजाला पण आपण निवडून कसे दिले असा प्रश्न त्यांना दुसऱ्याच दिवशी पडे. त्यात मग विरोधी पक्ष असत. ते तर नावापासूनच विरोध करायला सुरूवात करीत. आता पुढच्या वेळी आपलाच नंबर म्हणून पाच वर्ष ते अगदी अपचन होईपर्यंत मनात मांडे खात.

यावेळी महाराजांच्या मनात काय आले कोणास ठाऊक. त्यांना वाटले असे काही करावे की जनता हलली पाहिजे. दोन वर्षे निवडून आल्यावर झाली. त्यात नुसते मोर्चे निघाले नि सरकारविरोधी घोषणा झाल्या. महाराज कंटाळले. लोकही मंत्र्यांच्या मनमानी कारभारास कंटाळले. रोज उठून सरकारच्या काहीना काही भानगडी बाहेर पडू लागल्या. वर्तमानपत्रात रोज रकाने भरभरून चविष्ट मजकूर येऊ लागला. टीव्ही चॅनल्स वर खडाजंगी चर्चा होऊ लागल्या. विरोधी पक्ष आपल्या तरवारी नि बंदुका घेऊन नेम धरून बसू लागले.

सुंदोपसुंदी या शब्दाचा अर्थ कळावा म्हणून मुलांना बजबजपुरीचे उदाहरण दिले जाऊ लागले.

महाराज खूप म्हणजे खूपच कंटाळले. यावर उतारा काय? महाराजांनी उच्चस्तरीय बैठक घ्यायचे ठरवले.

उच्चस्तरीय बैठक तर घ्यायचे ठरले पण बजबजपुरीत तितक्या उंच खुर्च्या नि टेबलच नव्हते. बजबजपुरीतील सुतारांना ते बनवायचे ज्ञान ही नव्हते. तेव्हा असे टेबल नि खुर्ची बाहेरून आयात करण्यासाठी एका साध्या टेबलखुर्चीवर मंत्रीमंडळाची बैठक झाली. या नव्या टेबलखुर्च्यांसाठी बजेट मंजूर झाले. लवकरच ते बजबजपुरीत पोहोचले आणि उच्च स्तरीय बैठक झाली.

उच्चस्तरीय बैठकीस सर्व मंत्रीगण आले. बहुतांश मंत्र्यांना वयोमानानुसार इतक्या उंचावर चढणे अशक्य होते. त्यांना एका क्रेनच्या साह्याने उंचावर चढवून बसवण्यात आले. काही थोडे तरूण मंत्री होते ते टुणकन उडी मारून बसले. स्वत: महाराजांसाठी ही क्रेन वापरण्यात आली. सारे विराजमान झाले नि बैठक सुरू झाली. बजबजपुरीच्या इतिहासातील ही पहिलीच उच्च स्तरीय बैठक असल्याने सर्वांसच तिच्याबद्दल उत्सुकता होती.

विविध मंत्र्यांनी आपले पॉवरपॉइंट प्रेझेंटेशन केले. या मंत्र्यांकडे पॉवर असो नसो पॉवरपॉइंट मात्र सर्वांसच उपलब्ध होतो. त्याचा उपयोग करून महाराजांना या समस्येतून बाहेर काढण्यासाठी काय करता येईल याचा विचार झाला. कोणी सर्व मंत्रिमंडळाची परदेश टूर काढली तर जागाबदल होईल आणि परदेशातील राज्यकारभार जवळून पाहता येईल असे सुचवले. एका तरूण मंत्र्यांनी भ्रष्टाचार नाहीसा करावा म्हणजे हे सर्व टाळता येईल असे जोशात सांगितले. यावर अशा अवास्तव सूचनांनी आपला वेळ घालवू नये अशी ताकीद महाराजांनी त्या तरूण मंत्र्यांना दिली. त्यांनी अधिक मॅच्युअर विचार करण्याची गरज आहे असे सर्वच मंत्र्यांचे मत पडले.

महाराजांच्या मंत्रिमंडळातील एक वयोवृद्ध मंत्री माणिकराव घोरपडे यांनी सौजन्यमहिन्याची कल्पना मांडली. एक महिनाभराचे सौजन्य ही कल्पना पचनी पडणे आपल्या राज्यात कठीण आहे पण आठवड्यापुरता मर्यादित सौजन्य सप्ताह ही कल्पना चांगली आहे असे महाराजांना वाटले. इतर मंत्र्यांनीही ही कल्पना उचलून धरली. एक आठवडाभर कोणताही तंटा नाही नि भांडण नाही याचे महाराजांना अप्रूप वाटले आणि पहिल्या उच्चस्तरीय बैठकीत हा निर्णय झाल्याचे जाहीर करण्यात आले. माणिकराव घोरपडेंना या सप्ताहाचे 'ब्रॅंड अंबॅसिडर' नेमण्यात आले. ज्यांनी हयात तंटे बखेडे उभे करण्यात नि विविध राजकीय, सामाजिक, धार्मिक नि जातीय कारणांवरून घडवण्यात येणाऱ्या दंगलींचे आयोजन नि नियोजन करण्यात घालवली त्यांनी सौजन्य सप्ताहाचे आवाहन करावे यात एक काव्यगत न्याय होता. त्यामुळे लोकांचे मनोरंजन ही होण्यास मदत झाली. टीव्ही वरून वयोवृद्ध माणिकराव घोरपडेंनी या सप्ताहाची कल्पना विशद करणारे भाषण आपल्या थरथरत्या आवाजात केले. हे अगदीच नॉन ग्लॅमरस वाटल्याने एका प्रसिद्ध सिनेमानटीस ही पाचारण करण्यात आले. ती अंगठा वर करून 'आय सपोर्ट सावजन्य सप्ता. डू यू ?' असे आवाहन करू लागली. टीव्हीच्या सरकारी चॅनल्सवर 'सौजन्य सप्ताह पाळा गड्यांनो सौजन्य सप्ताह पाळा' असे गाणे वाजू लागले. या आवाहनांनंतर बजबजपुरीत एकच खळबळ उडाली.

या निर्णयानंतर एवढी खळबळ माजेल याचा अंदाज मात्र महाराजांना आला नव्हता. लोकांनी आधी सौजन्य दिवस असता तर चालले असते असे म्हटले तर काहींनी सौजन्य तास पाळावा किंवा सौजन्य मिनिट पाळावे अशी सूचना केली. एक आठवडाभर राज्य असे पॅरालिसिस झाल्या सारखे चालवावे का हा प्रश्न काहींनी विचारला. टीव्ही वाल्यांना खाद्य मिळाल्याने ते खूश झाले. वेगवेगळया चॅनल्स वर तेच तेच तज्ञ वेगवेगळी मते मांडू लागले आणि एका चॅनल वरून दुसरे चॅनल गाठता गाठता त्यांची दमछाक होऊ लागली. पेपरवाल्यांनी मुख्य पेपरात काहींच्या मुलाखती छापल्या आणि गुळगुळीत पुरवण्यात सिनेमा नटनट्यांच्या फोटो सकट प्रतिक्रिया छापल्या. अगदीच थोड्यांना ह्या

सप्ताहाबद्दल काही आपत्ती नव्हती. बाकीच्यांना मात्र यात भांडण्याची मुळे दिसत होती. एका मानसशास्त्रज्ञाच्या मते माणसाच्या आतील प्रतिक्रिया अशा कृत्रिम पणॆ दाबल्या गेल्या तर त्याचा द्प्पट जोमाने स्फोट होण्याची शक्यता होती. तर काहींचे मत सौजन्य हे लोकशाहीस घातक असून त्यात हुकुमशाहीची बीजे आहेत असे होते. मानवी मनास असे कृत्रिम वळण लावणे योग्य नसल्याचे एका समाजशास्त्रज्ञाने आधीच्या मानसशास्त्रज्ञाचे मत ऎकल्यावर परत सांगितले. एका नटाने तर सौजन्याचा पडद्यावर अविष्कार दाखवण्याकरता आपण या सप्ताहभर लोकांचे सूक्ष्म अवलोकन करणार आहोत असे सांगितले. त्याकरता एक चष्मा लवकरच आपण परदेशातून मागवणार आहोत असे त्याने सांगितले नि त्या चष्म्यावरील आयातकर सरकारने माफ करावा असा अर्ज ही दाखल करून टाकला. तर या आठवड्यापुरता आम्ही गळयात गळे घालून फोटो काढणार आहोत असे आघाडीच्या दोन नट्यांनी सांगितले. आमचे मतभेद आम्ही एक आठवड्याने पुढे ढकलू असे सिनेमा निर्मात्यांचे म्हणणे होते. मराठी नाट्यसृष्टीव्या काहींची प्रतिक्रिया मराठी पेपरात आली, त्यात निषेध म्हणूण आम्ही 'सौजन्याची ऎशीतैशी' हा नाट्य प्रयोग सादर करणार आहोत असे सांगितले. काहींना ही सांस्कृतिक आणीबाणी वाटली. लोकांचा सौजन्यास विरोध हा साहजिक होता. कारण बजबजपुरीत कोणत्याही गोष्टीस विरोध करण्याची परंपरा होती. सरकारने एखादे धोरण जाहीर केले की त्यास बरेवाईट काही न पाहता विरोध करणे हे त्या लोकशाहीचे वैशिष्ट्य होते. त्यामुळे सौजन्य सप्ताहाबद्दल हे असे होणे साहजिक होते. पण एवढ्या खळबळीचा अंदाज महाराजांना नव्हता. तरीही खबरदारी म्हणून महाराजांनी जास्त भवति न भवति होण्याच्या आत हा सप्ताह लागू करण्याचे ठरवले. लोक काही विचार करून कृती करण्याच्या आत हा सप्ताह सुरू देखील झाला. त्याला न्यायालयात आवाहन देण्यासाठी नि एक PIL दाखल करण्यासाठी काही एन्जीऒ सरसावत होत्या. पण महाराजांच्या अपवादात्मक चपळाईने सर्वांचे बेत धुळीस मिळवले गेले.

या सौजन्य सप्ताहाचा मग वटहुकूम निघाला. त्यात सौजन्याचा भंग करणाऱ्यास कडक शिक्षेची तरतूद करण्यात आली. ती शिक्षा मात्र सप्ताह संपल्यावर होणार असे जाहीर करण्यात आले. तळागाळातून ही सौजन्य झिरपावे म्हणून घराघरातही सौजन्याचे पालन

करण्यात यावे असे जाहीर झाले. हा वटहुकूम शाळा, कॉलेजे, घरे, गृहसंकुले, बागा, उद्याने, उपवने, बगीचे, सरकारी तथा खाजगी कचेऱ्या, टीव्ही, रेडीओ वरील कार्यक्रम, सार्वजनिक जागा, सार्वजनिक वाहने यांचबरोबर संसद आणि राज्यातील विधानसभा यांत ही लागू करण्यात आला. एवढ्या छोट्या अवधित अशा कायद्याचा मसुदा बनवण्याचे काम कायदा खात्याने एवढ्या शिताफीने केल्याबद्दल महाराजांनी स्वत:ची पाठ थोपटून घेतली.

सौजन्यसप्ताह लागू झाला आणि टीव्ही वाल्यांची धावपळ उडाली. सासू सुनेला सौजन्याने वागवते हे कोणाला पचनी पडेल? आणि पडलेच तर त्याला टीआरपी काय मिळणार? सिरियलवाल्यांची झोप उडाली. संघर्ष हमारा नारा है म्हणणाऱ्या सिरियल्सच्या लेखकांना इमर्जन्सी बोलावले गेले. सगळा ट्रॅक बदलणे कठीण असताना त्यात काहींनी सुनेला स्वप्न पडल्याचे दाखवले जाईल असे ठरवले तर काहींनी सासूस कुठल्यातरी ट्रॅवल्स बरोबर मलेशिया किंवा सिंगापूरला पाठवायचे ठरवले. त्यातून त्या ट्रॅवल्स कंपनीकडून पैसे पण कमवता येतील म्हणून निर्मातेही खूश झाले. आठवडाभर हा सौजन्याचा उपवास झाल्यावर सापाचे विष जसे काही दिवस न वापरल्यास जास्तच जहरी बनते तशा या साऱ्या सासवा आपला हिसका अधिक जोमाने दाखवतील आणि बुडालेला टीआरपी खेचून आणतील अशी सोय कथानकात करण्याचे आदेश लेखकांस देण्यात आले. ते बिचारे काय करतील? हुकुमानुसार कथा वळण घेते तशी इथेही वळण घेईल असे म्हणून आपली मान मोडून सौजन्याच्या ना ना तऱ्हा शोधण्यापाठी लागले. जगातले सारे हलवाई आणून त्यांच्या समोर बसवण्यात आले. त्यातून तरी काही गोड शब्द लेखणीतून बाहेर पडोत. या आठवडाभरातील टीआरपींच्या चिंतेने चॅनेल हेडना झोप येईना झाली.

खरी गंमत रेल्वे नि बसेस मध्ये झाली. लोक चढण्या आधी 'पहले आप, पहले आप' म्हणू लागले. त्यात त्यांची बस नि गाडी सुटू लागली आणि बस नि गाड्या रिकाम्या धावू लागल्या. लवकरच लोकांनी स्वत:स सावरले आणि रांगेने ते बस गाड्यांत शिरू

लागले. त्या लाईनी पाहून मुंग्यांनाही आपली रांग एवढी नीट नसते याची लाज वाटली. रिक्षावाले सवयीने 'नाही नाही' म्हणायचे सोडून 'या साहेब, कुठे सोडू?' असा प्रश्न विचारू लागले. एक दोन दिवसात त्यांना या वागण्याचा ताण असह्य झाला आणि कित्येक जण सप्ताह संपेपर्यंत सुटीवर गेले. विमानांना मात्र या सप्ताहाची झळ बसली नाही. तिथे इंग्रजीतून कृत्रिम सौजन्य बारोमास वाहात असते. त्यात जास्त काही न करता ते अजूनच नम्रपणे 'सर' आणि 'मॅडम' म्हणू लागले. रस्त्यारस्त्यातून लोकांची भांडणे बंद झाली आणि लोक एक दुसऱ्यांना मदत करू लागले. काही संवेदनशील लोक तर मोळी उचलून देण्यासाठी कुणी म्हातारी मोळीवाली दिसते का हे शोधत फिरू लागले. आजकाल लाकडाच्या मोळया बांधून कोणी जात नसल्याने आपल्यातील सौजन्यास बाहेर वाट करून देता येत नसल्याबद्दल त्यांना अपार खंत वाटली.

घराघरात या सप्ताहाचा परिणाम झाला. सौजन्य सप्ताह म्हणजे काहींना सौ. जन्य सप्ताह वाटला. म्हणजे या सप्ताहात तरी बायको आपल्याला जास्त टोचून बोलणार नाही आणि आपले सौ. जन्य प्रॉब्लेम्स आठवड्यासाठी सुटतील असे असंख्य नवऱ्यांना वाटले आणि त्यांनी परत याच महाराजांना पुढच्या निवडणुकीत मत द्यायचे ठरवून टाकले. 'सख्खा भाऊ पक्का वैरी' अशा टाइपच्या कुटुंबातून आपापसातील वैरे आठवडाभर पुढे ढकलण्याचे ठरवले. त्या आठवडाभरात आपल्या वैरांची मनातल्या मनात उजळणी करून आपले वैर अजूनही कसे वाढवता येईल याच्या मनातल्या मनात योजना बनवल्या. हा एक आठवडा संपला की बघून घेऊ असे त्यांनी मनोमन ठरवून टाकले.

सौजन्याचे वारे संसद आणि विधानसभांत ही वाहिले. विरोधी पक्षीयांनी कायद्याचा बडगा नको म्हणून गप्प बसायचे ठरवले आणि अख्खा आठवडाभर संसदेचे कामकाज अखंड सुरू राहिले. कोणीच सभागृहाचे काम तहकूब न करवल्याने आपल्या कामातून आपल्याला सुटका मिळत नाही हे पाहून सत्ताधारी पक्षाचे आमदार नि खासदार

वैतागले पण सौजन्य दाखवीत ते सुद्धा गप्प राहिले. राज्याराज्यातून मुख्यमंत्र्यांविरोधातील स्व आणि विरोधी पक्षीयांच्या मोहिमा आठवडाभर स्थगित झाल्या आणि देशभरातले मुख्यमंत्री मात्र त्यामुळे खूश झाले.

सौजन्य सप्ताह संपला आणि सर्वांनीच सुटकेचा नि:श्वास टाकला. हे प्रकरण तसे सर्वांनीच एंजॉय मात्र केले. दररोज मसाल्याचे पदार्थ नि मांसाहारी यांसारखे तामसी खाणाऱ्यास कधीमधी सात्विक आहार बरा वाटतो तसे हे झाले अशी प्रतिक्रिया एक विचारवंत श्री. दशसहस्त्रबुद्धे यांनी दिली. राज्यभरातून काही काही कायदेभंगाच्या तक्रारी आल्या. त्यांचा सहानुभुतीने विचार करून जास्त कारवाई न करण्याचे सरकारने ठरवले. या सप्ताहाची आठवण म्हणून दर महिन्यात एका ठराविक दिवशी सौजन्य मिनीट पाळून सर्वांनी एक मिनीटाची शांतता पाळण्याचे घोषित करण्यात आले.



१२

## प्रॅक्टिकल रॅशनॅलिझम : श्री. सदाराम सदाफुलेंची एक मुलाखत

माणूस हा एक मोठा चमत्कारिक प्राणी आहे. साधेपणाने रहा, मोह टाळा वगैरे साध्या साध्याच गोष्टी सांगायला कित्येक साधू संतांनी अवतार घेतले. नुसती स्वच्छता पाळा एवढे सांगायला गाडगेबाबांनी आपला जन्म घालवला. वेगवेगळे धर्म पण असेच काहीतरी सांगतात नि शिकवतात. जीवन वगैरे सॉलिड गोष्टी सोडा, 'रस्त्यावर थुंकू नका' किंवा 'बसमध्ये लायनीत चढा' अशा गोष्टीपण लोकांना ओरडून सांगाव्या लागतात. या उलट चोरी, दरोडे , फसवणूक वगैरे पहा, दिवसेंदिवस कायदा आणि सुव्यवस्था जणू आयसीयूत पडल्यासारखी आहे. पोलिस ओव्हरटाईम काम करत आहेत. पण आजवर कोणाला चोऱ्या कशा कराव्यात किंवा दरोडे घालावेत कसे, वा फसवणूक कशी करावी याचे धडे कोणी ऑफिशियली देत नाहीत. 'फसवणुकीचे तंत्र आणि मंत्र' किंवा 'दहा दिवसात यशस्वी दरोडेखोर व्हा, ' 'चौर्यकर्म क्लासेस' असे काही कुठे अधिकृतपणे दिसत नाही. या गोष्टी तरीही पॉप्युलर आहेत. उलट साधुसंतांच्या शिकवणी लोकांना पटत नसाव्यात. कारण त्या ऐकल्या तर जातात पण प्रत्यक्षात म्हणजे practically कोणी follow करताना दिसत नाहीत. हे अपयश साधूसंतांचेच म्हणायचे. यातून मध्यम मार्ग म्हणजे प्रॅक्टिकल रॅशनॅलिझम. या प्रॅक्टिकल रॅशनॅलिझम चे प्रवर्तक आणि मुख्य प्रचारक श्री. सदाराम सदारंग सदाफुले यांच्याशी या विषयावर केलेली ही बातचीत.

*हे प्रॅक्टिकल रॅशनॅलिझम काय आहे?*

स. स. सदाफुले : आजवर मोठमोठी माणसे सांगून आणि शिकवून गेली, हे करा ते करा, असे वागा, अमूक करू नका वगैरे. लोक काय ऐकून घेतात भक्तीभावाने आणि दुसऱ्या कानाने सोडूनही देतात. मी सांगतो तो आहे मध्यममार्ग. म्हणजे साध्या भाषेत असे

: सदैव सत्यच बोला हा आदर्श, सत्य बोला हा ठीक, जमेल तसे सत्य बोला हा प्रॅक्टिकल आणि नेहमी असत्य बोलणे हा वाममार्ग. हे आणि असेच प्रत्येक सदवर्तनाबद्दल सांगता येईल. . .

*म्हणजे संतांची शिकवणूक व्यर्थ असे प्रॅक्टिकल रॅशनॅलिझमला म्हणावयाचे आहे काय ?*

स. स. स. : नाही. अगदी असेच नाही. व्यर्थ नाही पण आदर्श व्यवस्था उभी राहण्यापर्यंत हा मधला मार्ग म्हणजे midway आहे. तरीदेखील काही कल्पना तर मला कालबाह्य आणि काही स्वत:शीच विसंगत वाटतात, म्हणजे self contradictory.

*हे जरा नीट विशद करून सांगाल काय?*

स. स. स : Yes, विशद हा शब्द मी खूप दिवसांनी ऐकतो आहे. थॅंक्स. हे असे यकश्चित, व्यवच्छेदक, किंकर्तव्यमूढ किंवा सबब वगैरे शब्द हल्ली दिसेनासेच झालेत. तुम्ही तो विशद शब्द वापरल्याबद्दल धन्यवाद. तर मूळ मुद्याकडे वळतो. साध्या साध्या शिकवणूकी घ्या, स्वावलंबन घ्या. कोठवर तुम्ही स्वत:वर अवलंबून राहणार? तुमची काय कल्पना आहे या स्वावलंबना विषयी?

*स्वत:ची कामे स्वत: करा. . .*

स. स. स : ठीक. आता let us stretch this to maximum. व्हा स्वावलंबी व्हा. मी तुम्हाला सांगतो, साधा भात बनवा. तुम्ही काय कराल? तांदूळ घ्याल पण ते तुम्ही तर नाहीना उत्पन्न केले? भांड्यात भात शिजवाल ते भांडे तुम्ही स्वत: बनवले आहे का? भात करायचा तर आधी तांदूळ पेरा, वाढवा. ते पीक येई पर्यंत कोठल्यातरी धातूचे भांडे बनवायला घ्या, आता भाताचे पीक काढायला लागणाऱ्या गोष्टी, नांगर म्हणा, पाण्याचे पाईप म्हणा आणि कितीतरी बाबी, काय काय बनवाल तुम्ही आणि कसे? साधा शर्ट घालायचा तर तुम्हाला कापसाचे झाड आधी लावावे लागेल. ते पीक काढा, सूत काढा,

विणा, बनवा कापड, मग शर्ट शिवा. तो पर्यंत रहा उघडे आणि काय ? थोडक्यात काय तर स्ववलंबी व्हा म्हणजे शक्य तितके स्वावलंबी व्हा.

*म्हणजे व्यावहारिकता ही महत्वाची. .*

स. स. स. : Yes, प्रॅक्टिकॅलिटी महत्वाची. दुसरे उदाहरण घेऊया. काही ग्रेट लोक सांगून गेलेत, nothing is impossible, या जगात अशक्य असे काहीच नाही. मी म्हणतो, nothing is impossible as long as it is possible. का? उद्या तुम्ही मला चॉपस्टिकनी भात वरण खायला सांगाल. इथे मला काट्याचमच्याने मसाला डोसा खाता येत नाही तर चॉपस्टिकने कसला भात खाणार? उपाशी राहीन मी आणि काय. जे लोक म्हणतात की हा impossible शब्द त्यांच्या डिक्शनरीत नाही त्यांना डिक्शनरी बदलून घ्यायला सांगावी लागेल कारण it is impossible to have a dictionary without the word impossible.

*अजून काही सांगा ना, तुमचे बोलणे ऐकत राहावेसे वाटते.*

स. स. स. : आता काही लोक काय सांगतात, मनात काही ठेऊ नका. बोलून टाका. कुढू नका. शक्य आहे का ते? उद्या रस्त्यात मला माझा बॉस दिसला. तो दिसला की मला त्याचा खडूस पणाच आठवतो. मी काय लगेच जाऊन तसे सांगू त्या बॉसला? उलट मी साहेवाला, 'काय साहेब इथे कसे ?' असेच हसून विचारणार ना? किंवा एखादा माणूस चालला आहे समजा रस्त्यावरून. लाल शर्ट आहे खाली हिरवी पॅंट. त्याची रंगसंगती पूर्ण करायला तुम्ही काय त्याला थांबवून सांगणार, 'बाबा रे, मधला सिग्नलचा पिवळा रंग सुटला कसा?' म्हणजे आपण काय बोलू याचे तारतम्य ठेवावेच लागते माणसाला.

*बरोबर आहे तुमचे. पण तुम्ही सुरूवातीला ते काहीतरी self contradictory म्हणाला होतात?*

स. स. स. : हो. एकच उदाहरण देतो. म्हणजे पहा, स्वाभिमान. साधूसंत म्हणाले 'मी पणा सोडा' आणि तुम्ही म्हणता स्वत:चा अभिमान बाळगा. आता नक्की काय करा? आहे की नाही विसंगती? माझे सांगणे हेच आहे, be practical. म्हणजे जमेल तितके नीट वागा.

*व्यावहारिक शहाणपण म्हणूया का यास?*

स. स. स. : होय, तुमचा मतितार्थ योग्य आहे पण एवढे सोपे करून सांगितले तर त्यास कोणी तत्वज्ञान मानणार नाही. आपल्याकडे साधे ज्ञान कठीण शब्दात दिले की त्याला शिक्षण म्हटले जाते. म्हणून तर एकतर संस्कृत नाहीतर इंग्रजी शब्द वापरावे लागतात, भाषेची काठिण्यपातळी वाढवण्यास. बाय द वे, काय भारदस्त शब्द आहे की नाही हा काठिण्यपातळी? असो. तर म्हणून मी यास प्रॅक्टिकल रॅशनॅलिझम म्हणतो.

*वा! फारच उदबोधक माहिती तुम्ही दिलीत, शेवटी काही संदेश द्याल का आम्हाला?*

स. स. स. : होय, थोडक्यात सांगायचे तर प्रॅक्टिकल रॅशनॅलिझम म्हणतो, 'जमेल तितके चांगले वागा, ' यात 'जमेल तितके' हा शब्द महत्वाचा. हे समजले की प्रॅक्टीकल रॅशनॅलिझम समजला.

१३

## यंग ओल्ड ब्रिगेड ची मिटींग

पुढचे सरकार तरूणांचे असे कोणी जाहीर केले नि जेष्ठांच्या दुनियेत एकच खळबळ उडाली. आपली सर्व कार्यक्षमता नि अनुभव पणाला लाऊन सहस्त्रचंद्रदर्शन झालेल्या नि त्याची आस लागलेल्या समस्तांनी सफेदशंकर यांच्या नेतृत्वाखाली तातडीची बैठक बोलावली. त्यांनी आपले नामकरण ही तातडीने 'यंग ओल्ड ब्रिगेड' करवून घेतले. सर्व मग तातडीने तयारीस लागले.

आपल्या व्हीलचेअर नीट चालत आहेत याची खात्री करून घेण्यात आली. त्या खडखडू नयेत म्हणून त्याच्या चाकांना ऑयलिंग करून घेतले. चष्मे नीट तपासून घेतले. हियरिंग एड्सच्या बॅटऱ्या नवीन घातल्या गेल्या. कवळया नीट बसताहेत याची तपासणी झाली. आहे त्याहून वय कमी दिसावे यासाठी जे काही लागेल त्याची तजवीज करण्यात सारे गढून गेले. आपापल्या सेक्रेटरींना भाषणे तयार करायचे फर्मान सोडले गेले.

हा विषयच असा होता की पक्षापक्ष भेद विसरले गेले. असे आपल्याकडे फार क्वचितच होते. एक तर आमदार खासदारांचे भत्ते नि पगार वाढवण्याच्या वेळी सारे एकत्र येतात. नाहीतर एकाच वेळी सत्ताधारी आणि विरोधी यांचे घोटाळे बाहेर आले तर दोन्हीही आपापला एकेक पॉइंट झाला समजून तह करतात. यावेळी साऱ्यांना आपल्या भवितव्याची चिंता वाटू लागली. मग देशापुढील वाढून ठेवलेल्या संकटाला तोंड देण्यासाठी सर्वांनी एकत्र यायचे ठरले ते त्यांच्या वयास नि अनुभवास साजेसेच होते.

मिटिंग साठी सारे जमले. कोणी व्हीलचेअर वरून आले, कोणी काठ्या टेकत पोहोचले. काही आपल्या सेक्रेटरीच्या आधाराने पोहोचले. काही थोडे तर आपल्या पायानेच चालत पोहोचले. बैठक सुरू झाली.

सर्वात जेष्ठ पण ताठ नि खणखणीत आवाजाचे विरोधी पक्षनेते श्री, सफेदशंकर यांनी पुढाकार घेऊन बैठक बोलावली होती. तेव्हा सर्वप्रथम ते उभे राहिले. ते अत्यंत सिनियर. राजकारणात साठसत्तर पावसाळे पाहिलेले. आपल्या ठणठणीत तब्येतीच्या जोरावर कोणी आपणास वृद्ध म्हणून बाद करू नये असेच त्यांना वाटे. त्यांनी प्रास्ताविक सुरू केले, 'बंधुंनो, ( आज त्या बैठकीस कोणीच भगिनी उपस्थित नव्हती हे त्यांनी चाणाक्षपणे क्षणार्धात पाहून घेतले. अनुभव म्हणतात तो हाच ) आज देशापुढील या गंभीर प्रश्नाचा सामना करायला आपण जमलो आहोत. जास्त मी काही बोलणार नाही. माझे सहकारी श्री. सभाशंकर मिश्रा जी आज अंथरूणास खिळले आहेत. त्यांनी लिहीलेली ही कविता मी वाचून दाखवतो.

**हम नहीं रिटायर होंगे!**

वो भी क्या दिन थे

जब सर पर भी बाल थे

अब भी हम कुछ कम नहीं

पर तब तो हम कमाल के थे

माना कि यारों सफेद ही सही

थोडे बाल तो हैं

माना कि यारों चेहरेपर अब

झुर्रियोंका जाल भी है

जाने वो क्यूं कहते हैं

अब बस हुआ, वापस जाओ

अब भी सीने में वो

आग फिरभी बाकी है

उम्र ढल रही पर

मंझिल अब भी बाकी है

मुश्किल है यारों इस ताज के बिगर जीना

सिर्फ़ इस खयाल से ही भर्राये सीना

सेवा की आदत से हम इस कदर मजबूर हैं

कैसे जिये हम पब्लिक लाइफ के बिना

डरते हैं कही आगे पीछे कोई लोग नहीं

डरते हैं सोचसे कि लाल दियेकी गाडी नहीं

सोचते हैं खो जाएंगे हम कहीं

जब बैठने को कोई कुर्सी ही नहीं

क्यों ये नाइन्साफी यारों

ये पेड वहीं जो हमने बोए

फल हुये इनके और हमहीं उन्हें खोए

क्यों देते हैं हमे वो उम्र का वास्ता

क्या सुनाएं हम हमारी दास्तां

क्या कहें हम हाथ में अब भी तीर और कमान है

कुछ न कहो यारों अभी तो हम जवान हैं. '

एवढे बोलून ते खाली बसले. सर्वांनी टाळयांचा कडकडाट करायचा प्रयत्न केला. शेवटच्या 'अभी तो मैं जवान हूं' मुळे थरथरते बाहू फुरफुरते झाले. बाहेरील कोणाला ते दिसले नसेल पण सर्वांना ते आतून जाणवले.

मग दुसरे जेष्ठ सदस्य कर्नाटकातील दौडा बट्टा गौडा यांचा नंबर आला. त्यांच्या नावाचा पुकारा झाला तेव्हा त्यांचा डोळा लागलेला होता. त्यांचे नाव तीनदा पुकारून झाले पण त्यांना जाग येण्याचे लक्षण दिसेना. मग त्यांचे विश्वासू आणि अनुभवी सेक्रेटरी पुढे सरसावले. त्यांनी आपल्या साहेबांच्या कानात हळूच म्हटले, ‘साहेब उठा, सीबीआय चे लोक येत आहेत! ’ याबरोबर गौडा जागे झाले. सेक्रेटरींनी त्यांच्या हातात भाषणाचे कागद कोंबले. गौडांनी आपला चष्मा ठीक केला, हियरिंग एड नीट बसवले. गौडांनी भाषण सुरू केले खरे पण ते अर्धवट झोपेत असावेत. त्यांच्या भाषणातील अर्धे शब्दच कळेनात. जे काही कळत होते त्यातून काही अर्थबोध होईना. ते शेवटी आम्ही शेंडी तुटो की पारंबी, देशाला अशा अवस्थेत सोडू शकत नाही असे (कानडीत) म्हणाले. त्यांचे कट्टर विरोधक बेट्टी दौडांना गौडा वडाच्या पारंब्यांना लटकताना दिसू लागले आणि त्यांना हसू आले. गौडांच्या सेक्रेटरींनी हळूच त्यांच्या हातातील भाषणाची पुढची पाने काढून घेतली. आपले भाषण अर्धवट झाल्याचे गौडांना जाणवलेच नाही आणि ते खाली बसले. सेक्रेटरींनी सभेतील सर्वांची अशी सुटका केली.

पाठोपाठ मग उत्तमराव पोपटराव देशमाने साहेब उभे राहिले. देशमाने साहेब अजूनही काठी शिवाय चालतात. ते जात्याच हुशार. त्यांच्याकडे तीन चार भाषणांचे सेट्स तयारच असतात. त्यातील एक ते वाचतात, ’ आज या ठिकाणी देशापुढील जटिल आणि गंभीर समस्येचा विचार करायला आपण जमलो आहोत. आपण सर्वांनी एकदिलाने याचा मुकाबला करणे गरजेचे आहे. आमच्यात ही हिंमत आहे. तो उत्साह आहे. ’ मूळ समस्येचा उल्लेखही न करता देशमाने साहेबांचे प्रवचन सुरू राहिले. काही सदस्यांना पेंग येऊ लागली. तसे सफेदशंकरांना त्यांना आवरावे लागले, ’देशमानेजी, आपके विचार हमे मालूम हुए हैं, अब बाकी लोगोंका कहना भी सुनना जरूरी है. ’ असे म्हणून सफेदशंकरांनी त्यांना खांद्यास धरून खाली बसवले.

मग एकेकाळी जहाल नि लढाऊ नेतृत्व केलेले बिहारी बाबू रतिमोहनसिंग यादव उभे राहिले. त्यांच्या आवाजात पूर्वीचा जोश नसला तरी तो असल्याचा थाट मात्र काही ते

कमी पडू देत नाहीत. ' कोण म्हणतोय आम्ही कमजोर आहोत? आम्हीच ही इमारत उभी केली. आम्हीच त्याच्या पायाचा दगड झालो. इन लोगोंको सिर्फ टॉप दिखता है. आम्हीच यापुढे कळस बनणार. लोक पायाशी नारळ फोडतात, त्याचे घाव आम्ही सोसणार आणि हे सारे कळसावर बसून नारळ डोक्यावर ठेऊन घेणार. यह अन्याय हम नहीं सहेंगे.

बाहे ये कमजोर नहीं,

कौन कहता है हममें ये ताकत नहीं. '

त्यांचा आवेश मात्र या वयात ही वाखाणण्याजोगा होता.

त्यांचे भाषण संपत असतानाच दलजीतसिंग नावाचे सदस्य उभे राहिले. सफेदशंकर म्हणाले, 'तुमची पाळी येईल, जरा वाट पहा. ' तसा दलजीतसिंगांचा पारा अजूनच चढला. 'मैनू बादमें नही आताच बोलायचे' असा हट्ट ते धरून बसले. नंतर ते सफेदशंकरांच्या पुढच्या जागेत येऊन तावातावाने बोलू लागले तसा सफेदशंकरांना हा प्रकार कळला. 'दलजीतसिंगजी आप बैठ जाईए. आप समझते हैं वह ये जगह नहीं. यह कोई संसद नहीं कि यहा पर कोई आके शोर मचाये. ही एक गंभीर सभा आहे. ' पण दलजीतसिंग काही ऐकण्याच्या मनस्थितीत नव्हते. ते रागारागाने म्हणाले, 'मैं अभी सभात्याग करता हूं. ' असे म्हणून ते सभेतून बाहेर निघून गेले. 'आदतसे मजबूर' म्हणून बाकी सदस्यांनी निश्वास टाकला.

मग जरीसिंग राठोड उभे राहिले. त्यांनी तोंड उघडले तसे त्यांची कवळी बाहेर पडली. झटक्यात त्यांनी परत बसवली. ते सध्याचे मंत्री. त्यामुळे ते गंभीर पणेच बोलतात. 'पाकिस्तान को यह इशारा है. आम्ही कमजोर नाही. आमची खामोशी आणि संयम म्हणजे आमची कमजोरी नाही. हमने पाकिस्तान को निन्यानबे बार चेतावनी दी है. अब यह सौ वी बार हम चेतावनी दे रहे हैं. ' सर्व सदस्य ऐकून घेतात. जरिसिंग एकतर मंत्री त्यात परत पाकिस्तानचा उल्लेख. या मिटींग नंतर त्यांना परराष्ट्र मंत्र्यांच्या मिटींग मध्ये बोलायचे असते. ते चुकून तेच भाषण वाचतात. सर्व उपस्थितांनी शक्य तेवढ्या जोरात टाळ्या

वाजवल्या. सफेदशंकर म्हणाले, ‘या टाळया पाकिस्तानला दिलेल्या इशाऱ्यांच्या सेंच्युरीसाठी आहेत. जरीसिंगजी को हार्दिक बधाईयां. ’

मग परिक्षित उल्लाळ उभे राहिले. ते ‘बॅकवर्ड पार्टी ऑफ इंडिया’ चे एकमेव सांसद. आरक्षण हा त्यांचा आवडता मुद्दा. ब्याकवर्डपणाचा त्यांचा अभिमान त्यांच्या कोणत्याही भाषणात दिसल्याशिवाय राहात नाही. ते म्हणतात, ‘आम्हाला आरक्षण हवे. मंत्रिमंडळातील तीस टक्के पदे जेष्ठांनाच दिली गेली पाहिजेत. ’ इथे उपस्थित सर्वांची बाकीच्या आरक्षणाबद्दल स्व आणि स्व पक्षाला सोयिस्कर अशी मते होती. येथे मात्र पक्षापक्ष भेद गळून पडला. सर्वांनी आपल्या पुढील बाकाच्या फळया वाजवून या आरक्षणाचे स्वागत केले. काहींच्या डोळयांपुढे या आरक्षणातून मिळालेले मंत्रिपद नि लाल दिव्याची गाडी तरळून गेली.

त्यानंतर स्वातंत्र्यसैनिक पंढरीनाथ काशीनाथ विंचूरकर उभे राहिले. हे खरे द्रष्टे नेते. स्वातंत्र्य नजरेत आले नि ज्या ज्या नेत्यांनी त्यानंतर स्वातंत्र्य लढ्यात उडी घेतली त्यातील हे एक. आपल्याला स्वातंत्र्यसैनिक म्हणवून घेण्यास काही महिने तरी कैदेत राहणे गरजेचे आहे हे त्यांच्या त्यावयातील द्रष्टेपणाचेच लक्षण म्हटले पाहिजे. त्यासाठी त्यांनी कायदेभंग करून अटक करवून घेतली होती. त्यानंतर ते स्वातंत्र्यसैनिक हे बिरूद लावायला विसरत नाहीत. आपल्या भाषणात त्या काही महिन्यांच्या कैदेची आठवण ते काढल्याशिवाय राहात नाहीत. ‘आम्ही स्वातंत्र्यासाठी तुरूंगवास भोगला. अपेष्टा सहन केल्या. त्यामुळेच हे दिवस आजच्या पिढीस दिसत आहेत. त्यांनी कृतघ्नपणे आमची संभावना वृद्धांत करणे हे आमच्या जिव्हारी लागत आहे. आम्ही तुमचे आदर्श आहोत. आमच्या मुळेच या देशाचे भले होईल. तरूणांनीच सत्तेपासून दूर रहावे. या पिढीचे वागणे म्हणजे आयत्या बिळावर नागोबा प्रमाणे आहे. ’ त्यांच्या भाषणातील सत्तेचा रोखठोक उल्लेख सर्वांना आवडला. त्यामुळे सर्वांनी टाळया वाजवल्या.

मग उभे राहिलेले माणिकराव नररत्न म्हणजे विरोधीबाकांवर आयुष्य काढलेले एक जेष्ठ नेते. त्यांना या निवडणुकीत तरी सत्तासुंदरीचा प्रसाद मिळायची आशा होती. ती

पण अशी धुळीस मिळताना पाहून त्यांना अतीच धक्का बसला होता. ते उभे राहिले. तावातावाने बोलण्यास ते हातवारे करू लागले. सर्वांना ते हात हलताना दिसले पण आवाज काही येईना. त्यानंतर कोणाला काही कळायच्या आतच ते धाडकन खाली कोसळले. सारे जण सुन्न झाले. बाहेरील सिक्युरीटीने धावपळ करून त्यांना हॉस्पिटलात हलवले. ते वाचण्याची शक्यता कोणालाच वाटत नव्हती. काही वेळ सारे शांत पणे बसून राहिले. हॉस्पिटलचा फोन आला तसे सफेदशंकर उभे राहिले. 'आज नररत्नजी ने हमारे सामने ही देश के लिये बलिदान किया है. आम्ही हे नेहमीच लक्षात ठेऊ. आपल्या न्याय्य हक्कांसाठी लढत राहणे हीच त्यांना खरी श्रद्धांजली ठरेल. '

मग ज्यांना शक्य होते ते दोन मिनिटे उठून उभे राहिले. दोन मिनीटांच्या शांततेनंतर सभा तहकूब झाली. कित्येकांची भाषणे बाकी राहिली होती, पण संसदीय लोकशाहीत मुरलेल्यांसाठी औचित्याचा मुद्दा नक्कीच जास्त महत्त्वाचा होता.

१४

## आमच्या शाही विवाहाची दास्तान

रामराम! आम्ही जास्वंदराव महिपतराव दांडगे पाटील. मालगुंजच्या राज्याचे एकमेव वारसदार. आमचे नशिब थोर की आमचा जन्म महिपतराव पाटीलांच्या पोटी झाला. आमच्या मालगुंजातील आमचे आबा म्हणजे महिपतराव संपतराव दांडगे पाटील एक बडे प्रस्थ. त्यांचा सामाजिक आणि राजकीय हात धरू शकेल असा इथे पंचक्रोशीत कोणी नाही. एके काळी शेतमजूरी करणारे माझे आबा त्यावेळी राजाराम मुरकें सारख्या मोठ्या नेत्याच्या संपर्कात येतात काय नि आपले साम्राज्य उभारतात काय सारेच सुरस आहे. त्यांचा एकुलता वारस म्हणून मालगुंजात आमची वट आहे. तर सांगायची गोष्ट आमच्या विवाहाची आहे.

विवाहाचा विषय आबांनी खरंतर खूपच आधी म्हणजे आम्ही १६ वर्षाचे झालो तेव्हा काढला होता. कॉलेजच्या शिक्षणासाठी शहरात जायचे होते. त्या आधी दहावीची परीक्षा माझ्या नि आबांच्या प्रयत्नाने पास झालो. 'एखाद्या  विलेक्शनची तयारी यापरिस सोपी रे जास्वंदा' असे आमचे आबा आमच्या पुढ्यात दहावीचे पेपर टाकता म्हणाले होते. इतरांना पेपर परिक्षा हॉल मध्ये मिळतात तर आम्हाला दोन दिवस आधीच मिळाले इतकाच काय तो फरक. आम्ही आबांचे लाडके. कुठून कोणास ठाऊक पण आबांनी आमच्या साठी कुठून तरी प्रयत्न करून हे सर्व जमवले होते. आम्ही मग दोन दिवस चित्त एकाग्र करून अभ्यास केला नि पास झालो. लोक उगाच दहावीचा बाऊ करतात. आम्ही झालो ना पास दोन दिवसांच्या अभ्यासात. आबा मग म्हणाले, 'गड्या मराठा गडी कसा रगेल नि रंगेल पाहिजेल. रगेलपणा तर जिंदगीभर दाखवू शकाल पण रंगेलपणासाठी हेच वय. त्यासाठी जावा तुम्ही कॉलेजात. जी हवी ती मजा मारा पण घरापतुर काय येऊ देऊ नका. हा महिपत काय पण सोसेल पण नाहक बदनामी नको. आनी लगीन आम्ही म्हणू तिथच होईल एवढं

ध्यानात टेवा. मुली समद्या सारख्या. आपल्याला घराण्याशी सोयरीक जोडावी लागते त्यातून आपले राजकारण पुढं न्यायचे असते. पूर्वी ज्याक होतं लोक दोन-तीन लगीन लावायचे पण आज ते अलाऊट नाही. त्यामुळे सर्व इचार करूनच व्हाया पाहिजेल. आपले साम्राज्य ज्याच्याने वाढेल त्याच्याशी सोयरीक. '

आम्ही आबांच्या शब्दाबाहेर नाही. आम्ही त्यांची आज्ञा पाळतो त्यामुळे रंगेलपणाचा आदेश शहरात राहून पाळला आणि विवाहासाठी मात्र शेवटी घरी परतून आलो, वडिलधाऱ्यांच्या आज्ञेचे पालन करायची आपली संस्कृती आहे. तसे दहावी पास होणे सोपे पण कॉलेज परिक्षा पास व्हायला अजूनच प्रयत्न करावे लागले. मेहनतीवाचून यश नाही असे आबा म्हणतात तेव्हा त्यांनी माझ्या या परिक्षांसाठी देखील खूप मेहनत घेतली. शेवटी डिग्री हाती पडलीच. आमचा काळया कोटातला डिग्री हातात घेतलेला फोटो पाहून आबा भरून पावले असावेत.

लवकरच झेडपीच्या निवडणूका होत्या आणि आबांना पंढरगावाचे आमदार संग्रामसिंग मोहितेंच्या पाठिंब्याची गरज होती. त्यांची मुलगी सुवर्णा आबांनी हेरून ठेवली होती. आता लग्नासाठी योग्य वेळ होती. आमचा एकविसावा वाढदिवस साजरा झाला आणि आबा जणू त्याचीच वाट पाहात होते. कायद्याने आम्ही विवाहायोग्य झालो नि संग्रामसिंगांच्या घरी सोयरीक जुळली. सगळे रीतसर ठरले. तोलामोलाच्या घराण्यातही मुलाचे मोल किती हे आम्हाला प्रत्यक्षच दिसले.

आमच्या लग्नाची तयारी सुरू झाली. सुवर्णाला मी फार पूर्वी म्हणजे ती शाळकरी पोर असताना पाहिले होते. तेव्हाच तिच्या डाव्या पायाला अपघात होऊन तो कायमचा वाकडा झाला होता त्यामुळे ती लंगडत होती. तिला एकदा तरी पाहावे किंवा तिच्याशी एकदा तरी बोलावे असे फार वाटत होते. आबा म्हणाले, 'जास्वंदा मुलीत काय

पाहायचे. सगळया मुली सारख्याच  इथून तिथून. आपले मुख्य ते राजकारण ते पुढे जायास पाहिजेल. त्यासाठी लग्न करावे लागले तरी बेहत्तर. शिवाजी महाराजांची नाही तीन चार लग्नं झाली होती ती सर्व राजकारणापायी बरं. ' बाकी आबांचे सर्व ठीक पण शिवाजी महाराजांशी तुलना म्हणजे जरा अतिच होते. पण आम्ही आबांच्या आज्ञेत होतो. ते म्हणतील ती पूर्व दिशा आणि ते म्हणतील तो सूर्य. मग ती उत्तर वा दक्षिण का असेना आणि तिथे सूर्याऐवजी ट्यूबलाईट का असेना. तरीदेखील तारूण्यसुलभ उत्साहात एकदा तरी सुवर्णाशी बोलावेसे वाटत होते हे खरे. अर्थात आम्ही आबांसमोर आमची जीभच म्यान करून टाकली होती.

लग्नाची मोठीच लगबग सुरू झाली. आमच्या मालगुंजात कसला हॉल नि बिल आणि कसले आलेय हॉटेल. पंढरगावी सर्व सोयी आहेत पण तिथे लग्नास आबांचा ठाम नकार. मुख्यमंत्री येणार, राज्याचे मंत्री येणार, दिल्लीतले मंत्री येणार, पक्षाचे ज्येष्ट नेते येणार त्यांच्या तोंडी मालगुंजचेच नाव बसायला हवे असे आबांचे म्हणणे. आबांचे व्यक्तिमत्वच असे की त्यांच्यापुढे कोणाचे काही चालत नाही. त्यात परत आम्ही मुलाकडचे. आबांच्या शब्दात सांगायचे तर, 'एका तागडीत मुलगा ठेवा आणि दुसरीत मुलीसकट अख्खे गाव ठेवा तरी मुलाची बाजूच जड ठरेल. ' आबा म्हणाले, 'संग्रामसिंग राज्यातले नेते हाईत पण आम्ही मुलाचे बाप आहोत. त्यातल्या त्यात वजन भरायला ठेवा काही पैसा अडका, सोने नाणे, नि जमीन जुमला, आपल्या ऐपतीनुसार नि आपल्या पोझिशनला शोभेल असा म्हणजे पहा होते का बाजू बरोबरीची. आता हा काय हुंडा नव्हं, प्रगतिशील राज्यात आमचा हुंड्याला इरोधच हाये. ' शेवटी लग्न आमच्या गावीच होणार ते ठरले.

मग जागेची शोधाशोध. माळरान साफ करून घेतले. दोन मोठे शामियाने उभारायचे ठरले. एक एयरकंडीशंड दिवाण-ए-खास सर्व मोठ्या नि तालेवारांसाठी नि दुसरा

दिवाण-ए-आम गावोगावच्या जनतेसाठी. ऊर्जामंत्र्यांना सांगून मालगुंजातील लोडशेडिंग बंद करवून घेतले. तितके दिवस दररोज शेजारच्या ढालगुंजात अजून सहा तास वीज कापण्याचा निर्णय झाला. एवढे लोक येणार तर रस्ते हवेत म्हणून गावात रस्ते बांधले गेले. जनता या सर्वांवर जबरदस्त खूश झाली. मग प्रश्न पाण्याचा राहिला. मुंबईहून टॅंकरचे टॅंकर पाणी मालगुंजमध्ये मागवले गेले. मालगुंजातल्या लोकांनी अख्ख्या हयातीत एवढे पाणी पाहिले नसेल एवढे त्या तीन चार दिवसात पाहिले. आबांची जनतेवर माया अशी की सर्व गावाला त्यांनी हंडा हंडा पाणी घरपोच पोचवले. घरपोच आलेले पाणी गावातल्या मतदार भगिनी प्रथमच पाहात होत्या. मग पुढारी येणार म्हणून हेलिपॅड बांधले गेले. दोन दिवस पेपरात मालगुंजचीच बातमी, 'केन्द्रीय मंत्री मालगुंजमध्ये' किंवा 'राज्य मंत्रिमंडळ लोटणार मालगुंजमध्ये', बातम्यांना खंड नव्हता. एका पेपरात आबांवर दोन पानी आर्टिकल. हे सर्व पाहिले की आबांचा मालगुंजमध्येच लग्नसमारंभ ठेवण्याचा हट्ट किती योग्य होता ते पटले.

प्रत्यक्ष लग्नात तर धमालच झाली. नवरा एरव्ही घोड्याचरून येतो तर आम्ही हत्ती वरून येणार होतो. त्यासाठी खास हत्ती मागवला गेला. प्रथम हत्तीवर बसायला आम्ही बिचकत होतो पण आबांच्या नजरेच्या धाकाने निमूट बसायला तयार झालो. मंडप पूर्ण सजवला होता. असा एयरकंडीशनचा गारवा गावात ऎन मे महिन्यात लोकांनी प्रथमच अनुभवला. हेलिपॅड नि हेलिकॉप्टर पहायला गर्दीच गर्दी जमली. दूरदूरच्या गावातले लोक जमले. मंत्री मंडळातले लोक गावकरी प्रथमच पाहात होते. आपण निवडून दिलेल्यांचा हा रूबाब त्यांनी याआधी कधी अनुभवला नव्हता. त्यात अजून पुढे सिनेमातल्या नटांची भर पडली नि गाव नुसता वेडावला. जेवणाची गंमत काय विचारता. पंगतीवर पंगती उठल्या. गावाने कधी ऎकले नसतील अशा मुंबईतील पदार्थांची रेलचेल होती. आबा जातीने लोकांना 'जेवून जा' असा आग्रह करीत होते. लोकं जेवून तृप्त होत होते. स्वत: मुख्यमंत्री आशिर्वाद द्यायला आलेले पाहून गावाचे डोळे दिपले. गाव पूर्ण उत्साहात होते. लोकांचा आबांबद्दलचा आदर ओसंडून वाहात होता. सर्व गाव चार दिवस दुष्काळ विसरून गेला होता. आबांनी

सग्रामसिंगांना हात कसा मोकळा सोडायला लावला होता. मालगुंजाच्याच काय पण आजूबाजूच्याही गावांच्या एकगठ्ठा मतांची बेगमी आबांनी या निमित्ताने करून टाकली. दुष्काळावर दोन दिवस का होईना गावाला उतारा मिळाला. प्यायला पाणी मिळाले. लोकांना आपण उंटासारखे पाणी पोटात साठवून ठेवावेसे वाटले असावे. कित्येकांनी तर खूप दिवसात भरलेले ताट पाहिले असावे.

लग्नाचे कवित्व जोरदार झाले. मुख्यमंत्र्यांच्या भेटीने मालगुंजचा गाजावाजा झाला. दिवसभर बातम्यांत मालगुंजात सर्वत्र आनंदीआनंद दिसला. संध्याकाळी काय कळ फिरली कुणास ठाऊक पण भर दुष्काळात असा शाही समारंभ झाला म्हणून टीका व्हायला लागली. विरोधकांना बरे पाहवत नाही हेच खरे. टीव्ही वर म्हणे सतत हेच सुरू झाले. अर्थात हे संध्याकाळचे प्रकरण आम्हाला दुसऱ्या दिवशी माहित पडले.

आम्हाला काय वाटते की आमच्या गावी दुष्काळ हा नेहमीचाच. परत दुष्काळही देवाचीच मर्जी. नाही पडला पाऊस तर आबा काय करणार? कमीतकमी चार दिवस दुष्काळ विसरायला तर लावला. मालगुंजात रस्ते तर आले. गावाचे नाव दिल्लीत पोचवले. या समारंभानिमित्त कित्येकांना रोजगार मिळाला तो वेगळाच. हितशत्रूंना हे पाहायचेच नाही तर काय करणार? आमच्या आऊ तर घाबरूनच गेल्या. आबा खंबीर होते. म्हणाले, 'चार दिस जाऊद्या नवे खाद्य मिळाले की सर्व विसरतील. '

खरे सांगू का तर संग्रामसिंग ही काही लहान सहान नाहीत. त्यांचे संपर्क जबरदस्त. त्यात ते राज्यस्तरावरचे नेते. आबा जिल्हापातळीवर असले तरी तितकेच भारी. त्यांचीही वट भारी. जास्तच टीका व्हायला लागली तर आम्ही नवीन पवित्रा घेतला. आबा म्हणाले, 'तुम्हाला इतकी पण परंपरा नाही माहित की लग्नाचा खर्च मुलीकडचे करतात. आपल्या देशात राहाता की आलेत फॉरीन मधून डायरेक्ट माईकचे बोंडूक घेऊन. गावाच्या चालीरीती ठाऊक नाहीत आले मोठे बडबड कराया. ' आबांच्या आक्रमक पवित्र्याने तो चॅनेलवाला पण गांगरला. आम्ही असा पत्ता संग्रामसिंगाकडे सोपवून मोकळे झालो.

संग्रामसिंग ही काही कमी धुरंधर नव्हते. कुस्ती खेळलेला गडी तो. एवढ्यात थोडीच चीतपट होणार होता? टीव्ही वर स्पॉन्सरड प्रोग्राम्स असतात तसे प्रत्येक गोष्टीकरता प्रायोजक उभे केले. म्हणजे मंडप नि एयर कंडीशनर कोण्या रस्ते बांधणाऱ्या कंपनीने तर जेवण रेल्वेतल्या खानपान कॉंट्रॅक्टरने स्पॉन्सर केल्याचे दाखवून दिले. लोकांची तोंडे गप्प झाली. पण बातम्यात मग नवी चर्चा सुरू झाली. या सर्व बदल्यात कॉंट्रॅक्टर्स ना काय मिळाले याची चर्चा सुरू झाली. झाल्या दोन गोष्टी, एक तर आमच्यावरील टीका संग्रामसिंगावर ट्रान्सफर झाली. आणि दुसरे टीव्ही वाल्यांचे अज्ञान उघडे पडले. या सर्व कॉंट्रॅक्टरना संग्रामसिंगांनी आधीच उपकृत केले आणि त्यांचा लगामही संग्रामसिंगांच्याच हातात ठेवलेला आहे हे खरे. असे असताना नव्याने काही देण्याचे कारणच नव्हते हे टीव्ही वाल्यांना कोण सांगणार?

आज चार दिवस झाले लग्नाला. तिकडे दिल्लीत नवा बॅंक घोटाळा उघडकीस आलाय म्हणे. टीव्ही वाल्यांची माइकची बोंडके तिकडे वळली. आम्ही मागे पडलो. कोण काय लक्षात ठेवतोय? या सर्व गोंधळात आबा म्हणाले तेच खरे ठरले, ' हाडूक तिथे कुत्रा नि चारा तिथे मेंढरं. नवा चारा मिळाला की चालली ही टीव्हीची मेंढरं जातील तिथे चरायला. आपण फकस्त वाट पहायची. ' आबांचा अनुभवच दांडगा. परत एकदा ते म्हणाले तेच खरे होताना दिसले.

या सर्व गोंधळात आम्ही सुवर्णाकडे पाहायला विसरूनच गेलो. तीही समजूतदार. तिची काही अपेक्षा नसावी. आमच्या आऊ एकदा म्हणाल्याच सुवर्णाला, तुझ्यारूपाने सुवर्ण आणि सुवर्णा दोन्ही घरात येत आहेत. पुढे मागे सुवर्णाकडे लक्ष द्यावेच लागेल.

## १५

## आमची सामाजिक वैशिष्ट्ये

आम्ही एक समाज म्हणून एकसंध आहोत. आमच्यात दुरून कितीही फरक दिसले तरी आम्ही एकासारखे एकच आहोत. आमच्या महाराष्ट्राच्या मातीचा हा गुण असेल पण जाती पाती, धर्म बिर्म या सीमा आम्ही मानत नाही. आम्ही त्या पलिकडे आहोत. आमच्यात सामायिक गुण अवगुण सर्व सारखेच आहेत. आम्हाला कित्येक शतकांची परंपरा आहे. कित्येक मोठ्या मोठ्या माणसांनी हा महाराष्ट्र घडवला आहे. त्यामुळे त्या सर्वांचा आदर्श आम्ही ठेऊन असतो. ही मोठी देवमाणसे. त्यांच्यासारखे आम्ही होऊ शकत नाही पण त्यांची दैनंदिन पूजा मात्र आम्ही सदैव करत असतो. त्यांचे आदर्श पाळण्यासाठी नसून ते सर्वांना अभिमानाने सांगण्यासाठीच आहेत याची नम्र जाणीव आमच्या मातीतून आलेल्या सर्वांनाच आहे. त्या मोठ्या व्यक्तिंना आम्ही वंदनीय, पूजनीय मानतो आणि त्यांचा उपमर्द होऊ नये म्हणून त्यांच्या सारखे काही भव्यदिव्य न करण्याचाच आमचा प्रयत्न असतो. शेवटी आपण देवाशी काय बरोबरी करणार? कोणी त्यांचा उपमर्द केल्याचा नुसता संशय जरी आला तरी आम्ही त्यास इंगा दाखवल्यावाचून राहात नाही. असो. तर अशा या आमच्या महाराष्ट्राची काही सामूहिक वैशिष्ट्ये आहेत. ती आम्ही जिवापाड जपत आलो आहोत.

<u>परंपरा आणि रूढीप्रियता</u>

आमचा समाज परंपरांचा पाईक आहे. रूढींचा आम्हाला अभिमान आहे. विशेषत: आमच्या कौटुंबिक पातळीवर आम्ही त्या पाळतोच. उदाहरणच द्यायचे तर कित्येक वर्षांची आमची हुंडा घेण्याची पद्धत. आमचे पूर्वज आमच्याहून हुशार होते. त्यांनी काही एका विचारानेच ही प्रथा पाडली. आता काही जण समाजद्रोह करून यास विरोध करतात पण बहुजन समाज त्यांना दाद न देता त्यांना त्यांची जागा दाखवून देतो. जातपात हा आमचा प्राण आहे. त्यासाठी आम्ही प्राणाचीही बाजी लावू शकतो. जातीच्या उतरंडीवर आमचा समाज समतोल साधून उभा आहे हेच खरे. मध्ये मध्ये कोणास जातीपातीचा

कळवळा येऊन मग समानता आठवू लागते. पण या जगात एकासारखी दुसरी गोष्ट दुसरी नाही हे आम्ही जाणतो. उगाच नाकाला जीभ लावायचा प्रयत्न आम्ही करीत नाही. आम्ही तत्त्वाचे पक्के आहोतच.

देह कष्टवण्याची तयारी

आमचे ऋषिमुनी तप करीत. देह झिजवित. देह कष्टवण्याची आमची परंपरा आहे. व्रतवैकल्ये नि उपासतापास करून आम्ही व्यक्तिगत कष्ट उपसतोच. पण एक समाज म्हणून आम्ही एकसंध आहोत. त्यामुळे आम्ही संपूर्ण समाज म्हणून स्वकष्ट करतो. आमच्या समाजास त्रास झाला तरी आम्ही त्याची पत्रास बाळगत नाही. आमचे सणच पहा. दिवाळीत आम्ही फटाक्यांनी आसमंत दणाणून सोडतो. हवा नि ध्वनी कितीही प्रदूषित झाले तरी बेहत्तर पण आम्ही आमचा बाणा सोडत नाही. गणपती उत्सवात आम्ही जल आणि ध्वनी प्रदूषण करून घेतो. होळीत झाडांची तोडातोड झाली तरी चालेल. पण आम्ही आमचे सण साजरे करतोच. इथेही आम्ही आमची परंपरा सोडत नाही.

भाषाभिमान

आमच्या भाषेचा आम्हाला अभिमानच नव्हे तर गर्व ही आहे. जेव्हाकेव्हा शक्य होईल तेव्हा आम्ही आमच्या 'मदर्टंग' मध्ये म्हणजे मायमराठीतच बोलतो. आजही आमच्या कडे काही मराठी माध्यमातील शाळा आम्ही टिकवून ठेवल्या आहेत. आमच्या बोलण्यात एका वाक्यात तीन हून जास्त इंग्रजी शब्द येऊ नयेत म्हणून आम्ही सजग असतो. आमच्या बाण्यानुसार आम्ही घरात फक्त मराठीतच भांडतो पण बाहेर आमच्या कॉस्मोपॉलिटन समाजास कळावे म्हणून मराठी माणसाशीही हिंदीत भांडू शकतो. मराठीस आम्ही राजभाषेचा दर्जा देऊनही ती राजाराणी प्रमाणे वागून आपला माज न दाखवता एखाद्या गुलामासारखी इतर भाषांची सेवा करेल याची काळजी घेतो. आमची सहिष्णुता आम्हाला येथे उपयोगी पडते.

देवभक्ती

देवभक्ती हा आमचा युएस्पी आहे. देवळात नि देव्हार्‍यातच देव आहे यावर आमची श्रद्धा आहे. कबीर, ज्ञानेश्वर, तुकाराम वगैरे संतांना मानवात आणि प्राणिमात्रात ईश्वर दिसला. थोर संतच ते. त्यांना जे दिसते ते आम्हा सर्वसामान्यांना कुठून दिसेल? आम्ही साधे लोक त्याच देवळांत ईश्वराचा शोध घेतो. आमचा देव देव्हार्‍यातच बरा. या देवास ही आम्ही दैनंदिन जीवनात येऊ देत नाही. सकाळी पूजा उरकली की आम्ही दुसर्‍या दिवशी पर्यंत आपले काम करायला मोकळे. मग त्यात आम्ही काही चांगले वाईट पाहात बसत नाही. आम्ही इतरांस हीन लेखू की खोटेपणाने वागू येथे आम्ही देवाला आडवे येऊ देत नाही. विशिष्ट देवाचीच आम्ही भक्ती करावी असेही नाही. आज मार्केट इकॉनॉमीचा जमाना आहे. जो भाव जास्त देईल त्याला प्रधान्य मिळणारच. तसे जो आमच्या मागण्या पुर्‍या करील तोच खरा देव. याला काही जण नवसाला पावणे ही म्हणतात. आम्ही त्याच देवाला शरण जातो. त्याची पूजा करतो. काही देव माणसे फकीराप्रमाणे आयुष्य घालवतात त्याचे आम्हाला वाईट वाटते. त्यांच्या पश्चात आम्ही त्यांच्या साठी सोन्याची सिंहासने बनवतो. त्यांनी भले साधेपणाची शिकवण दिली असेल पण किमान मृत्युनंतर तरी त्या महात्म्यांची परवड आम्ही होऊ देत नाही. त्यांची भव्य देवळे बनवतो. त्यांना मखरात बसवले की आम्ही त्यांची शिकवण कशी पाळणार? कारण जाणूनबुजून देवमाणसंच ती.

आम्ही आमच्या देवात ही माणसाचे गुण पाहातो. म्हणजे एका अर्थाने आम्ही देवाचे मानवीकरण करतो. साधी नवसाची गोष्ट पहा. माणूस आपापल्या कामातून जास्तीचे उत्पन्न मिळावे म्हणून लाच घेतो. त्यातील जे प्रामाणिक असतात ते काम करतातही. तसेच देवाचे. आम्ही केलेल्या नवसाची फेड झाली नाही तर देव रागावणारच. सर्व शक्तीमान तो. संतांना भले तो दयाळू की दयाघन बाटो पण आम्हाला काय सोडणार आहे तो? आम्ही देवाला त्यामुळे घाबरूनच असतो.

<u>श्रद्धाळूपणा</u>

आम्ही जात्याच अती श्रद्धाळू आहोत. आमची श्रद्धा विविध लोकांवर असते. म्हणजे देवावरची श्रद्धा हा एक भाग झाला पण त्याचबरोबर त्या देवाचे अवतार असणारे

साधू आणि बाबा यांना आम्ही मानतो. सर्वशक्तिमान ईश्वराच्या जवळ काही मिळवून घ्यायचे असेल तर आम्ही त्याच्या अवतारांना शरण जातोच. त्यांच्या मठात नि आश्रमातून आम्ही त्यांच्या पुढे लायनी लावून त्यांना शरण जातो. आम्हाला अंधश्रद्धाळू म्हणणारे काही पुरोगामी म्हणवणारे आमच्या ह्याच महाराष्ट्रात आहेत. त्यांच्या मागे आमची सर्वसामान्य जनता लागत नाही.

महिलाधोरण

आमच्या पुरोगामी राज्याचे खास महिला धोरण आहे. आमच्या पोथ्यापुराणांत देवी आहेत. त्यांच्या पुढे आम्ही नतमस्तक होतो. त्यांना शरण जाणे आमचे आम्ही कर्तव्य मानतो. पण इतर नॉन-देवी महिलांच्या बाबतीत आमचे धोरण स्पष्ट असते. त्यांची जागा कोठे आहे ते त्यांना देखील माहित असते आणि त्यात फरक होऊ नये याची आम्ही काळजी घेतो. कारण हा आमचा वारसा आहे. जन्मदात्री म्हणून तिचे महत्त्व असेल पण आमचा वंश आमच्या मुलामुळेच वाढतो असे आम्ही मानतो. या जगात स्त्रीला सोसाव्या लागणाऱ्या कष्टांची आम्हाला सतत जाणीव असते. म्हणूनच या जगात येऊन त्यांनी दु:खी कष्टी होऊ नये म्हणून त्यांच्या जन्माआधीच त्यांना संपवून त्यांच्या यातना संपवण्यासाठी आम्ही विज्ञानाची मदत घेतो. यात आमच्या कडे स्त्री-पुरूष संतुलन बिघडते अशी ओरड काही ( परत तेच! ) पुरोगामी करतात. आम्ही त्यांना कसली धूप घालतोय? त्यांच्या या त्र्यागयाकडे दुर्लक्ष करून आम्ही हे उदात्त कार्य पुढे सुरू ठेवले आहे. महिलांची याबाबतीत पुरोगामी लोकांपेक्षा जास्त काळजी आम्हीच घेतो.

आम्हीच श्रेष्ठ

पूर्वेस सूर्य उगवतो, म्हणजे सूर्य उगवेल ती पूर्व हे साऱ्या जगास ठाऊक आहे. ही पूर्व दिशा जगास उजेड देते. पूर्वेकडील आम्ही जगात श्रेष्ठ आहोत हे आम्हास ठाऊक नव्हते आधी. आम्हाला याकरता इंग्लंड नि अमेरिकेतूनही सर्टिफिकेट्स मिळू लागली. त्यामुळेच आम्ही श्रेष्ठ आहोत हे आम्हाला कळले. आमच्या हुशार विद्यार्थ्यांस त्यामुळे विद्याप्राप्तीस

पाश्चिमात्य देशांत जायची इच्छा होत असते. आमची बाळे मग तेथेस देशसेवेस रूजू होतात. याबाबतीत हे विश्वची माझे घर हे आमचे धोरण आहे.

## भ्रष्टाचाराचा तिटकारा

आम्हाला दुसऱ्यांच्या भ्रष्टाचाराचा तिटकारा आहे. ‘सब साले चोर हैं’ हे आमचे ब्रीद वाक्यच असावे. आम्ही इतरांच्या या भ्रष्टाचाराच्या बातम्या चवीने ऐकतो. त्यांनी पकडले जाऊन कसा मूर्खपणा केला याबाबत आम्ही विचार करतो. या भ्रष्टाचारात कोणी किती माया गोळा केली यावरून आम्हाला त्या त्या क्षेत्रातील potentialचा अंदाज येतो. आम्ही मग त्यावरून स्फूर्ती घेतो. आम्ही आमच्या दिवाणखान्यात या भ्रष्टाचारा बद्दल गरमागरम चर्चा करतो.

## सत्यवादीत्व

आम्ही शक्य होईल तितके सत्यच बोलतो. होता होईल तेवढे सत्य बोलावे हे आम्ही पाळतो. सिनेमात पोलिसही शेवटीच येतात तसा सत्याचाच विजय शेवटी होतो यावर आमची श्रद्धा आहे. सतचा असत वर नेहमीच विजय होतो याचा अर्थ जो विजयी होईल तो नेहमीच सत्य असतो हे आम्ही समजलो आहोत. तसेच हा विजय शेवटीच होतो. त्यामुळे अधे मधे सत्याच्या विजयाची आम्ही अपेक्षा करत बसत नाही. एवढे सामुदायिक शहाणपण आम्ही कमाविले आहे.

अशी ही आमच्या समाजाची काही सामायिक वैशिष्ट्ये आहेत. त्यामुळे व्यक्ती तितक्या प्रकृती म्हटले तरी अनेकते मध्ये एकता आहे असे म्हणतात ते उगीच नाही.

१६

## सुकाळी महाराष्ट्राची गायडेड टूर

इये महाराष्ट्र नगरी भयंकर दुष्काळ पडला. १९७२ नंतर असा दुष्काळ कोणी पाहिला नव्हता. तसा हा सरकारमान्य म्हणजे Government recognised दुष्काळ आहे. पण आम्हाला काही हे पटत नाही. या सुजलाम भूमीत दुष्काळ पडूच शकत नाही. आमच्या इथे तर सुकाळच सुकाळ आहे सगळीकडे. बघायची इच्छा असेल तर दिसेल आणि आम्ही तो दाखवूही तुम्हाला. आम्ही घेऊन जात आहोत महाराष्ट्राच्या गायडॅड टूरवर. नीट लक्ष देऊन ऐका, आमचा गाईड जरा हाऽ आहे, तो बोलतोच नव्हे तर मध्ये मध्ये कवितेतच बोलतो. जरा सांभाळून घ्या आणि डोळे आणि कान उघडे ठेऊन बघा म्हणजे झाले.

गाईड :

सुस्वागतम, सुस्वागतम. सर्वांचे स्वागत आहे. मी तुम्हाला महाराष्ट्रातला सुकाळ दाखवणार आहे आणि काही काही ऐकवणार आहे. आमचा राज्यात धान्यधुन्याचा आणि अन्नपाण्याचा भले असेल तुटवडा पण बाकी कित्येक गोष्टींचा सुकाळ आहे. चला तर आपण बघूया.

सुस्वागतम सुस्वागतम
आगतम स्वागतम सर्वांचे
बघावे भाग्य महाराष्ट्राचे
या देशी सुकाळ सदा
पाऊस घोषणांचा पडे सर्वदा
बघावी नि परिसावी
ही महाराष्ट्राची सुकाळी कथा

सर्व जण गाईडने दिलेला चष्मा डोळयावर चढवतात. गाईडच्या मागे मागे निघतात.

ऐका नीट. ( लांबून आवाज येतो. )

मी एक जंबाळ

मी एक लंबाळ

माझ्या नको पडू मागे

घेऊन कापडाचे तागे तागे

उसवशील उगीच धागे धागे

ऐकलंत? कळलं नसेल काही. घाबरू नका, कोणालाच नाही कळलं. कदाचित त्या कविला देखिल. हा आमच्या राज्यातील कविजनांचा नमुना आहे. कविजनांचा सुकाळ येथे माळरानावर तण माजावे तसा माजला आहे. कोणी त्यास कॉंग्रेस गवताची उपमा देईल.

एकाएकी गाईड स्वत:च वाण नाही तर गुण लागल्यासारखा कविता म्हणू लागतो. .

इये महाराष्ट्राचिये नगरी

कविजनांचा पहा सुकाळू

कविजन इथे माजले फार

जणू माळरानी तण फार

कॉंग्रेसगवताचे पीक

जणु दिसत असे चोहिकडे

आम्ही कोण म्हणून काय पुसता

आम्ही असू ट ला फ चे जुळारू

पाडण्या कविता वापरू

बुंदीचा झाऱ्या

ठोकूनी अक्षरे बसविती

कालिदासा लाजविती

अर्थ प्रकटो न प्रकटो

याचि न यांना क्षिती

हे कविसंमेलन भरले आहे. समोरचा श्रोतेवर्ग कसा बसला आहे पहा. त्यातील जे जागे आहेत ते आपल्या पाळीची वाट पाहणारे अन्य कवी आहेत आणि जे निद्रावस्थेत आहेत ते खरे श्रोते आहेत. त्यांच्या घोरण्याचा आवाज कधी कधी कवितांच्या आवाजावर जाऊ लागला तर बाकीचे जागे कवी त्यांना उठवत आहेत. पहा, पहा आहे की नाही कविजनांचा सुकाळच सुकाळ?

चला आता पुढे पुढे चला.

ती पहा गर्दीच गर्दी दिसते आहे तिकडे. ते सारे भक्त गण आहेत बरे. तो आश्रम आहे बाबांचा. मोठे महात्मा आहेत, डायरेक्ट देवाचे एजंट म्हणाना. आमच्या पवित्र देशात असे खूप सारे आहेत. कोणी त्यांना बापू म्हणतात, कॉणी महाराज तर कोणी स्वामी. काहीही म्हणा. आमच्या या महाराष्ट्र देशी यांचा सुकाळ आहे कारण ही भूमीच पवित्र आहे.

इये महाराष्ट्राचिये नगरी

साधुसंताचा सुकाळू

जणु देवाचा अवतारू

पैलतीरी नेती तारू

करण्या बहुतांचा उद्धारू

हातातुनी काढती अंगारू

जन मागे लागले फारू

मग उधळे यांचे वारू

जनसामान्य पुजिती

आशीर्वादास वाकती

सकलांस हे उद्धरीती

दक्षिणा घेऊनी

ते तुम्हाला मोहापासून दूर राहण्याची शिकवणूक देतील, तुम्ही फक्त त्यांना आपल्याकडची संपत्ती त्यांना दान देता की नाही यावर ते ठरवतील की तुमची भक्ती कोणत्या प्रतीची आहे. आपल्या मोहाला सोडून तुम्ही यांच्या चरणी आपली संपत्ती वाहा. ते तुम्हाला पैलतीरी नेतीलच, फक्त यांच्या चरणी आपली यथाशक्ती संपत्ती आणि जमलंच तर भक्ती  वाहावी लागते. यांच्या आश्रमांची आणि मठांची येथे गर्दी आहे. या साधुसंतांच्या देशात तुम्हाला परमार्थाची वाट हे दाखवतील. आमच्या महाराष्ट्रात यांचा सुकाळ आहे सगळीकडे.

तिकडे पहा. त्यांच्या हाताकडे पहा, कसे तुमच्याकडे रोखले आहेत पहा. ते आपले पुढारी आहेत. गल्ली गल्लीतून हे पुढारी आपल्याला दिसतील. आपल्याला पुढे नेण्यास हे उत्सुक आहेत.

इये महाराष्ट्राचिये नगरी

असे पुढारियांचा सुकाळू

जरी असे दुष्काळू

अनुयायांचा

म्हणती हे नेता आणिक पुढारी

बहुजन उद्धारी

बोल बोलता बोले भारी

खळळं आणि खट्याक

तो गल्लीतील कोणी दादा

मान त्यास मिळे इथे सर्वदा

समजावे आज न उद्या

हा होईल पुढारी

घोषणा करितसे बहु

योजनांचा पाऊस वाहू

ऐशा बोलण्याच्या कढीस

ऊत कोठूनी येईल?

तोडफोडीने अन्यायावरील प्रतिकार यावर यांचे नेतृत्व पुढे आलेले आहे. फक्त अन्याय कोणावर नि कसा यांच्या व्याख्या ते स्वत:च करतात आणि स्वत:च या अन्यायाचा बदला घेतात. हे लोकांचे रक्षण करतात, कित्येकदा स्वत:पासून सुद्धा. नीट ऐका ते काय म्हणताहेत, बहुधा दुष्काळावर काहीतरी उपाय सांगत असतील. यांच्या राज्यात घोषणांचा नि योजनांचा सुकाळ आहे. घोषणांवर पीक निघत असते तर आपल्या राज्यात कधी अन्नधान्याचा दुष्काळ पडलाच नसता.

चला अजून पुढे चला. गहन तत्त्वज्ञान ऐकायची मनाची तयारी करा. आपले आपले कान उपदेशाचे डोस ऐकण्यास उघडे ठेवा. पहा आणि ऐका. नीट कान द्या. हे आपल्याला दिशा दाखवणारे विचारवंत आहेत.

इये महाराष्ट्राचिये नगरी

विचारवंतांचा सुकाळू

जरी तयांच्या विचारांत

विचार नसो.

स्वत:स म्हणती तत्वज्ञ

तरी सर्वगुण संपन्न

उच्चकुल उत्पन्न

असती हे.

विचार मांडावा नेटका

जरी असेल किती थोटका

वाटो किती वरवरचा

कोणासही

मांडा विचार अति साधा

न सुचल्यास अन्यत्र शोधा

बोलावे परी भाषा

अतिकठीण.

असे स्वयंघोषित आणि स्वयंस्थापित म्हणजे स्वत:स स्वावलंबी मानणारे विचारवंत कोणताही टीव्ही चॅनेल लावा आपली मते मांडताना दिसतील. कोणाकोणाचा कोणतारी ism असतो, यांच्या मतांना मी Superficialism म्हणतो. यांचा सुकाळ हे आमचे व्यवच्छेदक लक्षण आहे.

तर असे आहे महाराष्ट्राचे सुकाळ पर्यटन. यांचे दर्शन घ्या आणि धन्य व्हा.

१७

**स्वातंत्र्य! द इंडिपेंडन्स**

सकाळ सकाळी मॉर्निंग वॉक घेतला की ताजेतवाने आणि फ्रेश वाटते. दिवसभराच्या डेली रूटीन मधे उत्साह द एंथुसियाझम वाटतो ( आजच्या एसेमेसी लिंगोत एंथु ). आज १५ ऑगस्ट. स्वातंत्र्य द इंडिपेंडेंस दिन. तो साजरा करण्यासाठी मी आज एक तास जास्त लोळत पडायचे ठरवले होते. १५ ऑगस्ट आणि २६ जानेवारी या दोनच दिवशी मी राष्ट्रपती, पंतप्रधान, राज्यपाल किंवा मुख्यमंत्री नसल्याचे बरे वाटते. त्या सर्वांना लवकर उठून पांढरे कपडे घालून झेंडावंदन आणि वर परत लोकांना उत्साह वाटेल असे भाषण द टॉक ठोकावे लागते. ते त्यांचे काम द टास्क आहेच पण त्यानंतरही माझा उत्साह द एंथु वाढल्याचे काही आठवत नाही. आज खाली उतरलो तर मॉर्निंग वॉकला उशीर द लेट झाला होता. विन्या खूप दिवसांनी भेटला.

'आज तू पण लेट?'

'आज स्वातंत्र्य दिन बाबा, ' मी म्हणालो.

मग आम्ही वॉकच्या कामाला लागलो. तेव्हढ्यात एक कुत्रा द डॉग जोरजोरात भुंकायला लागला.

विन्या म्हणाला, 'भुंकू देत त्याला. त्याचा पण स्वातंत्र्य दिन. भुंकायला कसली आलीये म्युनिसिपालिटिची परवानगी? आपल्या कडे थुंकणे आणि भुंकणे या दोनच क्रिया tax free आहेत. ' विन्या सत्य द ट्रूथ बोलतो नेहमी.

मग मी त्याला गंभीर द सिरीयस होत म्हणालो,

'विन्या स्वातंत्र्य म्हणजे काय ?'

विन्या म्हणाला, 'सोपे आहे रे जो जे वांछिल तो ते लाहो म्हणजे स्वातंत्र्य. प्रत्येक जण हवा तसा गोंधळ घालू शकेल ते खरे स्वातंत्र्य. '

*****

विन्याचे बोलणे मन द माइंड मधे घोळत होते. दुपारी झोप द स्लीप काढत असताना वेडी वाकडी वाक्ये दिसायला लागली :

७० हून अधिक वर्षे झाली आपल्या देशात स्वातंत्र्य खेळते आहे.

एखाद्या घरात हवा खेळती रहावी तसे आपल्या देशात स्वातंत्र्य खेळते आहे.

ते देशाच्या नसानसात एवढे भिनले आहे की त्यामुळे प्रत्येकालाच ते जाणवते आहे.

जिकडे पहावे तिकडे स्वातंत्र्य च स्वातंत्र्य.

आमदारांना आणि खासदारांना काम न करता गोंधळ घालण्याचे स्वातंत्र्य.

तोडफोड, खुर्च्या फेक, राजदंड पळवण्याचे स्वातंत्र्य.

एवढ्या मेहनतीसाठी आपले भत्ते नि पगार वाढवण्याचे स्वातंत्र्य.

सत्ताधाऱ्यांना कायदे करण्याचे स्वातंत्र्य.

कायदे करून ते न राबविण्याचे स्वातंत्र्य.

नागरिकांना ते न पाळण्याचे स्वातंत्र्य.

त्याबद्दल मनात आले तर शिक्षा न करण्याचे शासनाला स्वातंत्र्य.

चोर सोडून संन्याशाला सुळी चढवण्याचे स्वातंत्र्य

आणि संन्याशाला संन्यास सोडून चोर बनण्याचे स्वातंत्र्य.

तेच तेच बोलून लोकांना उल्लू बनवण्याचे स्वातंत्र्य.

लोकांनी स्वत:ला उल्लू बनवून घेण्याचे स्वातंत्र्य

आणि त्याच त्याच लोकांना परत निवडून देण्याचे स्वातंत्र्य.

सर्वांना आपापल्या भावना दुखवून घेण्याचे स्वातंत्र्य.

त्या दुखवल्या म्हणून इतरांना दुखवण्याचे स्वातंत्र्य.

एखाद्याला कार्टून काढायचे स्वातंत्र्य.

आणि कार्टून काढले म्हणून त्याला जेलात पाठवण्याचे स्वातंत्र्य.

इतिहास पचत नाही म्हणून तो पुस्तकांतून बदलण्याचे स्वातंत्र्य.

देवांना देव म्हणण्याचे स्वातंत्र्य

आणि मोठ्या माणसांना मॊठे म्हणण्याचे स्वातंत्र्य.

त्यांचीच शिकवणूक त्यांच्याच नावानी पायदळी तुडवण्याचे स्वातंत्र्य.

गरीबांना पैसे नाहीत म्हणून उपाशी राहण्याचे स्वातंत्र्य

आणि अति श्रीमंताना वजन कमी करण्यासाठी पैसे मोजून उपाशी राहण्याचे स्वातंत्र्य.

शेतकऱ्यांना जिवतॊड मेहनत करून धान्य पिकवायचे स्वातंत्र्य

दलालांना त्यातून पैसे कमवायचे स्वातंत्र्य.

नुकसान झाले म्हणून शेतकऱ्याला आत्महत्येचे स्वातंत्र्य

आणि त्याच्या नावाने गळा काढायचे पुढाऱ्यांना स्वातंत्र्य.

हवे ते लिहायचे लेखकाला स्वातंत्र्य

आणि ते बदलायला लावायचे राजकारण्यांना स्वातंत्र्य.

गद्याला पद्य म्हणायचे कवीला स्वातंत्र्य

कोठेही कोणालाही कविता ऐकवायचे स्वातंत्र्य.

सडेतोड नाटके आणि सिनेमे बनवायचे स्वातंत्र्य

आणि कुणाच्या शेपटावर पाय देण्याचे स्वातंत्र्य.

स्वघोषित सेन्सॉर मानण्याचे स्वातंत्र्य.

व्यापाऱ्यांना लोकांना लुटण्याचे स्वातंत्र्य

आणि लुबाडून घेण्याचे लोकांना स्वातंत्र्य.

हवे ते हवे तेव्हा हवे तसे हवे तिथे बोलण्याचे स्वातंत्र्य

कुणाला न पटले तर पिटवून घेण्याचे स्वातंत्र्य.

जे बोललो ते बोललोच नाही असे बोलण्याचे पुढाऱ्यांना स्वातंत्र्य.

मोठ्या मोठ्या हॉस्पिटलांना पेशंटाना लुटण्याचे स्वातंत्र्य

आणि पेशंटाना डॉक्टराला मारण्याचे स्वातंत्र्य

वकीलांना तारीख पे तारीख मिळवण्याचे स्वातंत्र्य

अशिलांना शिव्या घालायचे स्वातंत्र्य.

मुलांना जन्मता रडायचे स्वातंत्र्य.

काहींना जन्मभर रडायचे स्वातंत्र्य.

स्वातंत्र्याला पारतंत्र म्हणण्याचे स्वातंत्र्य

आणि पारतंत्र्याला स्वातंत्र्य म्हणण्याचे स्वातंत्र्य

स्वातंत्र्य स्वातंत्र्य सगळीकडे स्वातंत्र्य स्वातंत्र्य.

***

झोपून उठलो तेव्हा सहा द सिक्स वाजले होते.

*****

संध्याकाळ द एव्हिनिंग ला खाली उतरलो. विन्या परत भेटला.

त्याला म्हटले, 'काय केलंस आज?'

विन्या म्हणाला, 'दुसरे काय? देशभक्ती. बॉबी सिनेमा पाहिला आणि ताणून दिली. '

मी परत गंभीर द सिरियस होत विन्याला म्हटले, 'यार विन्या हे चूक आहे नाही अशा दिवशी उलट आपण दुप्पट द डबल काम करायला पाहिजे. '

विन्या म्हणाला, 'वेडा आहेस. '

विन्या मला वेडा द फूल म्हणाला याबद्द्ल राग येण्याऐवजी तो असे का म्हणाला याचीच मला जास्त उत्सुकता होती.

'मला सांग आपल्या देशात भरपूर अशी कुठली गोष्ट मिळते?

'सूर्यप्रकाश द सनलाईट, ' मी उत्साहात म्हणालो.

'भरपूर अशी एकच गोष्ट आहे आपल्याकडे भ. . '

बापरे विन्या शिव्या देतोय की काय असे मला वाटले.

'भ्रष्टाचार. '

'अरे भ्रष्टाचार द करप्शनचा इथे काय संबंध?'

एखाद्या झुरळ द कॉक्रोच कडे पहावे असे माझ्याकडे बघत तो म्हणाला, 'भ्रष्टाचार होतो कुठे? ऑफिसांत ना? मग अशा राष्ट्रीय सणांना सुट्टी दिली की त्या दिवशी पुरता भ्रष्टाचार बंद. लोकंच नाहीत ऑफिसात तर देणार कोण नि घेणार कोण?'

विन्या खरंच हुशार द क्लेव्हर आहे. मी म्हटले ना तो नेहमीच बरोबर द करेक्ट बोलतो. विन्या इज ग्रेट. शेवटी मित्र द फ्रेन्ड कोणाचा आहे?



# ई साहित्य प्रतिष्ठान

ई साहित्य प्रतिष्ठान मराठी साक्षरांमध्ये वाचनाची आवड निर्माण व्हावी आणि लेखक व कवींना एक सशक्त व्यासपीठ मिळावे या दुहेरी हेतूने स्थापन झाले. मराठीत एक जबरदस्त वाचन संस्कृती निर्माण व्हावी, तरुणांनी भरपूर वाचन करावे, ग्रामीण भागातील तरुणांना मोबाईलवर पुस्तके उपलब्ध व्हावीत, परदेशस्थ मराठी वाचकांना सहजासहजी इंटरनेटवर पुस्तके मिळावीत हे आमचे स्वप्न. जगातील चाळीस देशांतील  सुमारे साडेतीन लाख वाचक या चळवळीचे सभासद आहेत त्याशिवाय वर्षाला सुमारे तीस ते चाळीसलाख वाचक .वेबसाईटवरून पुस्तके डाऊनलोड करतात .

अर्थात याने आमचं समाधान नाहीसुमारे बाराकोटी मराठी माण्सांपैकी किमान अर्धे  . " .माउलिंनी सांगितलंय .व्हावेत अशी आमची इच्छा आहे "वाचक" म्हणजे सहा कोटी लोकजो जे वांछिल ते तो लाहो ."आमचीही वांछा  .पूर्ण करील "तो"करीलच.

आमच्या वाचकांना एकच विनंती. आपल्या ओळखीच्या किमान दहा साक्षरांचे ई मेल पत्ते आम्हाला पाठवा. अशा रितीने आपण तीनाचे तीस आणि तिसाचे तिनशे होऊ. या मराठीचिये नगरी ब्रह्मविद्येचा सुकाळू व्हायला वेळ नाही लागणार. सर्वांची साथ असेल तर.

एवढी विनंती मान्य कराच.

ई मेल पत्ते esahity@gmail.com या पत्त्यावर पाठवा बरं!